# मौलाना महंमद अली

## यांचें

# जीवनचरित्र



लेखक व प्रकाशक

एस्. एम्. शेख.

आर. डी. गुरव.

बी. बी. पाटील.

तासगांव ( सातारा ).

# प्रस्तावना

कोकोनाडा काँग्रेसचे अध्यक्ष, महात्मा गांधींचे एके काळचे निकट सहकारी व मुसलमान समाजाचे विश्वस्त पुढारी या नात्यांनीं मरहूम मौलाना महंमद अल्ली यांचें नांव हिंदी राष्ट्राच्या अर्वाचीन लढ्याच्या इतिहासांत चिरस्थायी होऊन राहील यांत शंका नाहीं. असहकारितेच्या पहिल्या आंदोलनाच्या वेळीं मौ. महंमद अल्लींनीं जें बहुमोल राष्ट्रकार्य केलें त्यामुळेंच १९२३ सालीं 'हिंदी राष्ट्राचे कर्णधार' अथवा 'राष्ट्र-सूत्रधार' होण्याचा बहुमान त्यांच्याकडे चालून आला होता. मौलानाची राष्ट्रभक्ति जितकी प्रखर होती किंवा त्यांची राष्ट्रीय वृत्ति जितकी उत्कट होती त्याहून त्यांची जातिनिष्ठा अधिक प्रबळ असल्यामुळें १९२७ सालानंतर देशाच्या राजकारणांत ते जे हतप्रभ किंवा अस्तंगत झाले ते पुन्हां पूर्वीच्या उज्ज्वल स्थितीला येऊं शकले नाहींत. तथापि खिलाफत चळवळीच्या बाबतींत त्यांनीं केलेलें कार्य हिंदी राष्ट्राला विसरतां येण्याजोगें नाहीं. काँग्रेसचे आतांपर्यंत जे ४४ अध्यक्ष होऊन गेले त्यांत सात मुसलमान आहेत. मौलाना महंमद अल्ली हे काँग्रेसचें अध्यक्षस्थान भूषणविणारे सातवे मुसलमान पुढारी होत. यावरून त्यांचें कार्य कसें अखिल भारतीय स्वरूपाचें होतें हें दिसून येईल.

हल्लीं राष्ट्रीय सभेनें हिंदी राष्ट्रीय ऐक्यासाठीं मुसलमान जनतेंत काँग्रेसची संघटना वाढविण्याचा जो नवीन उपक्रम सुरू केला आहे तो अत्यंत अभिनंदनीय आहे. संकुचित जातिनिष्ठेचें समूळ उच्छेदन करून देशांत व्यापक स्वरूपाची उदात्त राष्ट्रीय वृत्ति उत्पन्न करण्यासाठीं काँग्रेसनें जे अनेक कार्यक्रम हातीं घेतले आहेत ते जर सर्व जातींनीं एकनिष्ठेनें अंमलांत आणले तर राष्ट्रीय ऐक्याचें स्वप्न प्रत्यक्ष सृष्टींत उतरणें अशक्य होणार नाहीं. काँग्रेसनें ठिकठिकाणीं मुसलमान–जनता–संबंध कमिट्या स्थापन केल्या असून या दोन जमातींत ऐक्य घडवून आणण्यासाठीं पराकाष्ठेचे

प्रयत्न चालविले आहेत. अशा या योग्य वेळीं श्री.शेख व त्यांचे सहाय्यक श्री.गुरव आणि पाटील यांनीं मौलाना महंमद अलींचें हें चरित्र लिहून उपयुक्त कामगिरी बजाविली आहे यांत शंका नाहीं. मौलानांच्या आयुष्यांतील महत्त्वाच्या घडामोडींबरोबर त्यांच्या मानसिक स्थित्यंतरांचें व मतांतरांचेंही यथार्थ चित्र या चरित्रांत वाचकांना पहावयास सांपडेल. महंमद अलींची विद्वत्ता, त्यांचा वृत्तपत्रव्यवसाय, त्यांचे मुत्सद्देगिरीचें राजकारण, त्यांची देशसेवेची तळमळ इत्यादि गोष्टींची माहिती या पुस्तकांत सुसंगत रीतीनें आल्यामुळे तें वाचनीय व उपयुक्त झालें आहे.

१८।४।३८ रा. प्र. कानिटकर.

# दोन शब्द !

अखिल भारतवर्षांत अलीबंधु या नांवानें सर्वांचे परिचित असलेले मौ० शौकतअली व मौ० महंमदअली हे होत. पैकीं मरहूम मौ० महंमदअली यांचें जीवनचरित्र महाराष्ट्रांतील हिंदुमुसलमान बंधूंना हल्लींच्या काळांत उद्बोधक असल्यामुळें आम्हीं तें लिहून जनतेपुढें ठेवीत आहोंत.

वास्तविक पाहतां मौ० महंमदअलीसारखे हिंदुमुसलमान ऐक्याचे पुरस्कर्ते,निर्भीड वक्ते आणि देशभक्त इत्यादि गुणांनीं युक्त अशा विभूतींचें चरित्र यापूर्वींच लिहून प्रसिद्ध व्हावयास पाहिजे होतें. परंतु तें आजतागाईत मराठी भाषेंत लिहिलें न जावें याबद्दल दिलगिरी वाटत आहे. असो.

चरित्र लिहितांना प्रथम त्याच्या साधनसामुग्रीची आम्हांस मोठीच अडचण भासूं लागली व मनांत हेतु असतांनासुद्धां या व इतर कांहीं कारणांमुळें तें लवकर प्रसिद्ध करतां आलें नाहीं. परंतु इच्छा असली कीं मार्ग सुचतो त्याप्रमाणें मौ०महंमदअली ज्या वेळीं दिवंगत झाले,त्या वेळीं त्यांचें त्रोटक चरित्र उर्दू दैनिक खिलाफत मुंबई यांतून प्रसिद्ध झालें. त्यावरून चरित्रलेखनास बराच वाव मिळाला आणि कालानुक्रम व इतर राजकीय घडामोडी यांसंबंधी माहिती देतांना श्री० रा. गो. भिडे कृत ' पं० मालवीय, पं० जवाहिरलाल नेहरु यांचीं चरित्रें आणि श्री० रा. प्र. कानिटकर पुणें, यांनीं लिहिलेलें ' पं० मोतिलाल नेहरू ' चें चरित्र या पुस्तकांचाही आम्हांस बराच उपयोग झाला, याबद्दल आम्ही या सर्वांचे फार फार आभारी आहों.

एकंदरींत हें चरित्र आमच्या अल्पमतिनुसार जितकें विस्तृत करतां आलें तितकें तें करण्याचा आम्ही प्रयत्न केला आहे; तथापि

मनुष्यकृति ही चुकीस पात्र असते. तदनुसार या पुस्तकांत कांहीं दोष व अपुरेपणा राहिला असल्यास तो वाचकवर्गांनीं आम्हांस आपलेपणानें कळविल्यास त्याची पुढील आवृत्तींत जरूर ती सुधारणा करूं.

आमचे विनंतीस मान देऊन मौलाना शौकत अली साहेब एम्. एल्. सी. दिल्ली, यांनीं आपला स्वतःचा फोटो देऊन पुस्तक अर्पण करण्यास मान्यता दिली व कार्याबद्दल आनंद व्यक्त केला याजबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत ऋणी आहों.

तसेंच श्री० राजाराम प्रल्हाद कानिटकर एम्.ए. संपादक 'ध्रुव' पुणें यांनीं सदर चरित्रास प्रस्तावना लिहून पुस्तकाच्या उपयुक्ततेस अमूल्य जोड दिली याबद्दल त्यांचे आभारी आहों.

पुस्तकछपाईचें काम चित्रशाळा प्रेस पुणें यांचे चालक श्री. शंकर नरहर जोशी यांनीं अल्पावधींत सर्वांगसुंदर असें करून दिलें याबद्दल त्यांचेही आभारी आहों.

शेवटीं आमची ही अल्पशी सेवा आबालवृद्धांस आवडो अशी ईशचरणीं प्रार्थना करून वाचकांची रजा घेतों.

तामगांव<br>ता. १।५।१९३८

आपले नम्र,<br>लेखक

# अनुक्रमाणिका


| विषय | | पृष्ठ |
|---|---|---|
| भूमिका ... .... | .... | १ |
| प्रकरण १ लें—पूर्ववृत्त व जन्म .... | .... | ५ |
| प्रकरण २ रें—शिक्षण .... | .... | ९ |
| प्रकरण ३ रें—नोकरी .... | .... | १२ |
| प्रकरण ४ थें—लोकसेवा .... | .... | १५ |
| प्रकरण ५ वें—धार्मिक कार्य .... | .... | १९ |
| प्रकरण ६ वें—हिंदुमुसलमानांचें ऐक्य | .... | २३ |
| प्रकरण ७ वें—कराचीचा खटला.... | .... | २७ |
| प्रकरण ८ वें—कोकोनाडा कॉंग्रेस | .... | ३१ |
| प्रकरण ९ वें—राष्ट्रीय पक्षांत फाटाफूट | .... | ३४ |
| प्रकरण १० वें—सरकारशीं सहकार्य | .... | ३८ |
| प्रकरण ११ वें—राउंडटेबल कॉन्फरन्स | .... | ४१ |
| प्रकरण १२ वें—वज्राघात .... | .... | ४५ |
| परिशिष्ट ( अ ) महंमद अलींचें काव्य | | ५१ |
| परिशिष्ट ( ब )—महंमदअलींविषयीं वृत्तपत्रांचीं व व्यक्तींचीं मतें | | ५३ |


—

# अर्पण—पत्रिका



मौलाना शौकत अली.

यांचे ठायीं वसत असलेले निःस्सीम बंधुप्रेम, सामाजिक कळकळ, चारित्र्य वगैरे गुणांवर लुब्ध होऊन आमची ही कृति त्यांना प्रेमादरें अर्पण.

# भूमिका !

' साधवो न हि सर्वत्र चंदनं न वने वने ' ह्या सुभाषित चरणां-मध्यें मौलाना महंमद अली यांचें जीवनरहस्य सांठविलेलें आहे. आपलें सर्व आयुष्य लोकहितार्थ चंदनाप्रमाणें झिजवून, अखेर साधूफकिराप्रमाणें त्यागवृत्तीनें हिंदुस्थानची सेवा करीत असतां-नाच मौलाना महंमद अली यांनीं आपली इहलोकची यात्रा संप-विली, हा अपूर्व योगायोग नव्हे काय ?

१९३०–३१ हें साल हिंदुस्थानच्या इतिहासांत फारच मह-त्वाचें गणलें जाईल. कारण लाहोर कॉंग्रेसमध्यें पूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पास झाला. नंतर सविनय कायदेभंगाची सर्व देशभर चळ-वळही याच कालांत सुरू झाली, सुमारे पाउण लाख देशभक्त तुरुंगांत खेचले गेले. अशा रीतीनें ही चळवळ जोरावली.

या वेळीं जगांतील सर्व राष्ट्रांचें लक्ष या चळवळीकडे वेधलें. अशा प्रकारचा कॉंग्रेस चळवळीचा वाढता जोर जाणून तारीख २५।१।१९३० रोजीं राजप्रतिनिधि व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांनीं पार्लमेंटनें हिंदुस्थानविषयक पुढीलप्रमाणें धोरण आंखल्याचें जाहीर केलें. ' ब्रिटिश सरकारचें हिंदुस्थानासंबंधीचें ध्येय हिंदु-स्थानाला डोमिनियन स्टेटस ( वसाहतीचें स्वराज्य ) देणें हेंच योग्य आहे व त्या दिशेनेंच आम्हीं आपलें कार्य चालू ठेवणार ! आज हिंदुस्थानला जो दर्जा प्राप्त करून द्यावयाचा आहे, त्यांत सारासार विचार करून पुढारी व सरकार या उभयतांच्या तडजोडीनेंच सदर प्रश्न सुटेल. हें ठरविण्यासाठीं इंग्लंड येथें गोलमेज परिषद बोला-वण्यांत येत आहे. आणि त्या कामीं जनतेचा पाठिंबा मिळेल अशी आशा आहे. '

आमचें एवढेंच सांगणें आहे की, तुम्हीं हिंदी लोकांची एकजूट घडवून आणा म्हणजे गोलमेज परिषदेच्या वेळेपर्यंत जो अवधि आहे त्याचा उपयोग एकी घडवून आणण्याकडे करा, आणि ज्या वेळीं परिषदेचें निमंत्रण येईल त्या वेळीं एकमताची योजना पुढें मांडण्याला तयार व्हा.

इंग्रज सरकारनें वरील धोरण ठरविल्यानंतर देशांतील बऱ्याच पुढाऱ्यांना इंग्लंड येथें गोलमेज परिषदेस हजर रहाण्यासाठीं निमंत्रणें गेलीं, त्यापैकीं आमचे चरित्रनायक मौलाना महंमद अली यांनाही निमंत्रण झालें. या वेळीं मौलाना महंमद अली आजारी होते. तरी देशासाठी झटण्याचें ध्येय ज्यांनीं आजन्म स्वीकारलें ते ही सुसंधि कशी दवडणार ! गोलमेज परिषदेस हजर रहाण्यासाठीं मौलाना महंमद अली व्हाइसरॉय ऑफ इंडिया बोटीनें निघून गेले.

मौलाना महंमद अली इंग्लंडच्या भूमीवर उतरले. पुढें गोलमेज सभा पार्लमेंटगृहामध्यें सुरू झाली. सभेस इंग्लंड व हिंदुस्थान येथील पुढारी हिंदुस्थानचे बादशहा, मरहूम पंचमजॉर्ज, मुख्य प्रधान वगैरे हजर होते. जिकडेतिकडे गंभीरता पसरली होती. परिषदेस सुरवात झाल्यावर मौलाना महंमद अलींना कांहीं व्यक्तींच्या भाषणा-नंतर ता. १२।११।३० रोजीं भाषण करण्याची संधि देण्यांत आली.

त्यांच्या अंगांत फार वेळ बोलण्याची ताकत नव्हती, ते आजारीच होते, तरी त्यांच्यांत नवा जोर चढला. आपल्या आजा-राची त्यांनीं मुळींच परवा केली नाहीं. ते म्हणाले, ' महाराज ! मी या सभेमध्यें एका गरीब अशा देशासंबंधानें चार शब्द बोलणार आहे. मला येथें कोणत्याही समाजाचे पुढारी म्हणून पाठविलें नाहीं, ही गोष्ट विसरतां कामा नये. तसेंच माझ्या ज्ञातिबांधवांसंबंधानें स्वार्थ साधण्यास मी आलों नाहीं. मी जें काय मागणार आहे, तें सर्वांनी शांतपणें ऐकावें व कोणत्याहि विश्राम वळी न पडतां

त्याचा विचार करावा, म्हणजे माझ्या म्हणण्याची सत्यता आपणांस बरोबर पटेल. मी जेव्हां जेव्हां जगांतील इतर सुधारलेल्या राष्ट्रांकडे आणि ब्रिटिश सरकारच्या वैभवाकडे पहातों, तेव्हां तेव्हां हिंदुस्थान देशाच्या गुलामगिरीचें चित्र माझ्या डोळ्यांसमोर चटकन उभें राहतें व हृदय भरून येतें. यापुढें माझ्यानें हिंदुस्थानची गुलामगिरी आणि गुलामगिरीची स्थिति मुळींच पाहवत नाहीं. जर तुमच्या मनांत कांहीं भूतदया असेल तर माझी इच्छा पूर्ण कराल, व ती हीच कीं आम्हांला वसाहतीचा दर्जा नको, आमचे हातीं पूर्ण स्वराज्याचे हक्क द्या, व स्वराज्याचे हक्क घेऊनच मी हिंद भूमींत जाईन नाहींपेक्षां त्या गुलाम देशांत न जातां मी इकडेच कोठेंतरी स्वतंत्र देशांत प्राण सोडीन. शेवटीं या माझ्या म्हणण्याप्रमाणें जर तुम्हीं पूर्ण स्वातंत्र्य न द्याल तर माझें प्रेत येथेंच दफन करण्यासाठीं जागा तरी तुम्हास द्यावी लागेल, हें लक्षांत ठेवा! ”

मौलाना महंमद अलींचें हें भाषण ऐकून सर्वजण थक्क झाले. हिंदुस्थानच्या खऱ्या कैवाऱ्यांचे डोळे पाण्यानें भरून गेले सभागृहांतून शाबास ! शाबास ! ! महंमद अली शाबास ! ! ! असे आवाजावर आवाज निघूं लागले. जिकडे तिकडे या महंमद अलींच्या भाषणाबद्दल व धैर्याबद्दल तारीफ सुरू झाली. ब्रिटिश सत्ताधारी व सभासद यांना उद्देशून महंमद अली पुढें म्हणाले, “ हिंदुस्थानांत आमच्या देशबांधवांच्या अडचणी सरकारपुढें मांडण्यासाठीं मनाई झाली. लिहिण्याबोलण्याचे दरवाजे कायद्यानें बंद झाले. आपण सत्ताधारी आहां वाटेल तें करूं शकतां ! आमचेजवळ हात पसरून स्वराज्याचे हक्क मागणें हेंच शस्त्र आहे. परंतु याप्रमाणें मागणी करणारांनाहि तुमच्या शस्त्रांनीं उडवून टाकिल्यास आम्हीं मरणास तयार आहों. गुलामगिरींत राहून जगण्यापेक्षां असें मरणें काय वाईट आहे ? परंतु माझी मनोदेवता मला असें सांगते....

कीं, साम्राज्यसरकारचें अंतःकरण इतकें कठोर नाहीं. त्यांच्यांत दया आहे. ते स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते आहेत. तेथें त्याच्याकडून योग्य न्याय मिळेल. आतां या स्वराज्यदानाच्या आड हिंदुस्थानांतील हिंदु-मुसलमानांत ऐक्य नाहीं, असा एक प्रश्न वरचेवर पुढें येत आहे. परंतु मी त्याला मुळींच महत्त्व देत नाहीं. कारण हा प्रश्न सरकारनें सोडवावयाचा नसून तो आमचा आम्हींच सोडवूं. या दुहीमुळें आमची कितीतरी पिच्छेहाट व नुकसान होत आहे. हें आतां आम्हां सर्वांनाच कळून चुकलें आहे " असें म्हणून महंमद अलींनीं आपलें भाषण संपविलें.

याप्रमाणें हिंदुस्थानविषयक स्वदेशप्रीति मौ० महंमद अलींच्या ठिकाणीं किती उज्ज्वल होती, हें स्पष्ट होतें. महंमदअली मूळचेच आजारी ! त्यांत दगदगीनें त्यांच्या प्रकृतीवर अधिकच परिणाम झाला व त्या आजारांतच देशहिताचें कार्य करीत असतांना ते लंडन येथें ता. ४।१।१९३१ रोजीं दिवंगत झाले !

मौ० महंमद अली यांचें स्मरण होतांच ! मूर्तिमंत स्वातंत्र्य-देवताच डोळ्यांपुढें उभी राहाते ! त्यांचा गोड व जोरदार आवाज एकदां सभागृहांत घुमूं लागला, म्हणजे त्यांच्या भाषणशैलीनें श्रोतृवर्ग मुग्ध होऊन आपोआपच ओढला जाई, आणि भरत-खंडाच्या वक्तृत्वशैलीचा महिमा जगभर गाजून राही.

अत्यंत त्यागी व ध्येयवादी विभूति, थोर मुत्सद्दी, नमुनेदार अध्यापक, उत्कृष्ट व तेजस्वी वक्ता, कट्टा धर्माभिमानी व देशाभि-मानी अशा अनेक गुणांनीं मौ. महंमद अली हे युक्त असल्यानें त्यांचें जीवनचरित्र अखिल हिंदी जनतेस वंदनीय, स्मरणीय व अनुकरणीय वाटेल. अशा हेतूनेंच तें आम्हीं देण्याचें योजिलें आहे !

---

# मौलाना महंमद अली

### प्रकरण १ लें.

## पूर्ववृत्त व जन्म.

एकादें चित्र सुंदर दिसावें असें जर चित्रकारास वाटत असेल तर त्या चित्राचा आराखडा ठळक रीतीनें चितारला पाहिजे. हा चित्रकलेंतील विशेष होय. हाच नियम थोर विभूतींचें चरित्र रेखाटतांना पूर्णपणें लागूं पडतो. कारण अशा विभूतींचें चरित्र म्हणजे तत्कालीन वस्तुस्थितीचें उठावदार चित्रच होय ! अर्थात् हें चित्र उठावदार दिसण्याकरितां त्या काळची देशस्थिति ठळकपणें लोकांच्या नजरेस आणून देणें जरूर आहे. त्यावांचून त्या चित्राचा ठसा त्यांचे मनावर बरोबर उमटणार नाहीं. प्रस्तुत चरित्र हें गेल्या दहा वर्षांमागें ज्यांचें नांव अखिल हिंदुस्थानांत दुमदुमून राहिलें आणि आजहि ज्यांच्या नामोच्चाराबरोबर उज्ज्वल देशभक्ति, धर्माभिमान इत्यादि सद्गुण दृष्टिसमोर उभे रहातात, अशा त्या मौलाना महंमद अली नामक देशभक्त, स्वार्थत्यागी आणि राजकारणपटु विभूतींचें आहे.

मौलाना महंमद अलींच्या आयुष्यक्रमांतील प्रसंगांत उज्ज्वल देशभक्तीचा जितका लोकोत्तरपणा भरलेला आहे, तितका दुसऱ्या एकाद्या विभूतीच्या ठिकाणीं क्वचितच आढळून येईल ! राजकारणांत तर त्यांच्याइतका निष्णात मुत्सद्दी सांपडणें कठीण ! ! असें म्हटलें तरी चालेल. ! ! ! परंतु या सर्व बाबतींत मौलाना महंमद अलींच्या अंगच्या गुणांचा प्रकाश पडण्यास त्या वेळची देशकाल स्थितिच कारणीभूत झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. किंबहुना ही परिस्थिति नसती तर मौलाना महंमद अली ही व्यक्ति इतकी प्रसिद्धीस आली नसती ! आणि साहजिकच ती परिस्थिति अनुकूल होती म्हणूनच

हिंदुस्थानच्या भवितव्यतेवर त्यांच्या मुत्सद्देगिरीचा पूर्ण प्रकाश पडलेला आज दिसून येत आहे.

हिंदुस्थानच्या सुस्थितीचें हितचिंतक मौलाना महंमद अली हे होत. हें प्रथम त्यांचें चरित्र वाचणारानें लक्षांत ठेवणें जरूर आहे. एरव्हीं कोणास तें कळणार नाहीं. परंतु तत्पूर्वी त्या कालच्या परिस्थितीचें थोडक्यांत विवेचन करणें जरूर आहे. ब्रिटिश सरकारनें इ० स० १९१९ मध्यें सुधारणाकायद्यान्वयें हिंदुस्थानास स्वराज्याचे हक्क दिले. त्याप्रमाणें राज्यकारभारांत सरकार व प्रजाजन यांनीं सहकार्यानें वागून राष्ट्राचा उदयकाळ जवळ आणणें हें त्यांचें कर्तव्य ठरलें. म्हणून राष्ट्रीय सभेमार्फत हिंदु व मुसलमान या दोघांनीं मिळून मौलाना महंमद अली व इतर पुढारी यांचे समवेत अखिल हिंदुस्थानांत जी लोकजागृति केली, तींत हिंदुस्थानांत पूर्णपणें स्वराज्याचे हक्क दिल्याशिवाय लोकांचें समाधान होणार नाहीं अशी जोराची घोषणा प्रतिपादन करण्यांत आली. या वेळीही महंमद अलींनीं आटोकाट प्रयत्न केला व तसा प्रयत्न आमरण चालवून स्वदेश व स्वबंधु यांच्यासाठीं पुष्कळ हालअपेष्टा सोशिल्या.

हिंदुस्थानच्या नकाशावर जर विहंगम दृष्टीनें नजर फेकली तर लहानमोठीं अशीं अंदाजें ७०० शें संस्थानें असल्याचें दिसून येतें. त्यांपैकीं उत्तर हिंदुस्थानांत रामपूर म्हणून एक छोटेसें संस्थान आहे हीच आमच्या चरित्रनायकाची जन्मभूमि होय. त्यांचे आजे अलीबक्षखां हे रामपूर संस्थानचे नबाब युसफ अलीखान याचे कारकीर्दींत एका मोठ्या जागेवर नोकरीस राहिले. अलीबक्षखां यांचें मूळचें राहण्याचें गांव मुरादाबाद हें असून नोकरीनिमित्त ते आपली जन्मभूमि सोडून रामपूर येथेंच स्थाइक झाले. त्यांच्या ठायीं हुषारी, परोपकारबुद्धि, प्रामाणिकपणा इत्यादि सद्गुण असल्यानें ते धन्याचे फारच आवडते झाले. पुढें त्यांचें दैवच बलव-

त्तर म्हणून कीं काय एक अनपेक्षित गोष्ट घडून आली. उत्तर हिंदुस्थानांत इ० स० १८५७ मध्यें शिपायांचें बंड झालें. त्या वेळीं अलीबक्षखांनें ब्रिटिश सरकारास बंडनिवारणार्थ निरनिराळ्या प्रकारें सहाय्य केलें. या कामगिरीबद्दल त्यास सरकारानें मुरादाबाद जिल्ह्यांत एक मोठी जहागिरी दिली. तेव्हांपासून ह्यांच्या घराण्याची जहागीरदारांमध्यें गणना होऊं लागली.

अलीबक्षखांच्या पश्चात् त्यांचे पुत्र मौलाना अब्दुल अलीखां हेहि आपल्या वडिलाप्रमाणें रामपूर संस्थानांत मोठ्या हुद्यावर असून सर्व लोकांना प्रिय असे होते. यांचा विवाह एका थोर घराण्यांतील सुशील व सौंदर्यवान् बेगम अबादीबानू हिच्याशीं झाला. पुढें यांच्या पोटीं मौलाना शौकत अली नंतर मौलाना महंमद अली यांचा जन्म इ. स. १८७८ मध्यें झाला. 'शुद्ध बीजापोटीं फळें रसाळ गोमटीं' या संतउक्तीप्रमाणें या बाळाची बाळपणींच सतेज व सुंदर मूर्ति पाहून सर्व लोक त्याचें कौतुक करीत असत. पुत्रवात्सल्यांत ४।६ महिने मौ. अब्दुल अलीखां व बेगम अबादीबानू यांचा काळ आनंदानें गेला, पण ईश्वरी नेमानेम कांहीं निराळाच होता. या उभयतांच्या आनंदांत दुःखाचें विरजण पडलें. मौ. अब्दुल अलीखां हे कॉलऱ्याच्या आजारास बळी पडले ! त्यांच्या मरणानें अलीबंधु पोरके झाले. आणि अबादिबानूच्या वयाच्या २७ वें वर्षींच दुर्दैवानें त्यांना वैधव्य प्राप्त झालें ! बाल्यावस्थेंत असलेल्या अलीबंधूंना ही दुःखद स्थिति काय समजणार ? पण अबादीबानूवर मात्र आकाश कोसळलें ! त्यांनीं जगराहाटीकडे लक्ष दिलें व वैधव्याचें दुःख सोसण्यास त्या तयार झाल्या.

पतिनिधनानंतर अबादिबानूवर संसाराचा पडलेला भार, तसेंच अल्पवयी मुलांचें संरक्षण करून त्यांना सन्मार्गास लावण्याची जबाबदारी या दुहेरी पेचांत त्या सांपडल्या. या पेचांत एकादी

सामान्य स्त्री गोंधळूनच गेली असती, पण अबादिबानू ह्या खंबीर, निश्चयी व धार्मिक वृत्तीच्या असल्यामुळें आलेल्या संकटास त्यांनीं धैर्यानें तोंड दिलें. मौलाना शौकत अली व मौलाना महंमद अली यांची उत्तम जोपासना केली. पुढें महंमद अली जसजसे मोठे होत गेले तसतसें त्यांना व्यायाम व स्वच्छता यांची संवय लाविली. धार्मिक शिक्षणाचे धडे देण्याचा क्रमही सुरू केला. एकंदरीनें अबादिबानूंनीं आपल्या मुलांना लहानपणापासूनच चांगलें वळण लागावें याजबद्दल फारच काळजी घेतली. उबडच आहे लहान मुलांना जसें वळण लावावें तशीं तीं बनतात व हे सर्वस्वी पालकांच्या वागणुकीवर व शिकवणीवर अवलंबून असतें. अशा प्रकारचें तत्त्व अलीबंधूंच्या मातेस चांगलें पटलें होतें.

लहानपणीं महंमद अली आपले बालमित्र गोळा करून निरनिराळ्या प्रकारचे खेळ खेळत. त्यांच्या खेळांत संघशक्ति वेळोवेळीं दृष्टीस पडत असे. त्यावरून मौ. महंमद अली हे जणूं काय पुढील आयुष्यांतील सहकार्यरूपी रूपरेखाच आखण्याची पूर्वतयारी करीत आहेत असें वाटे! सर्व मुलांचें पुढारीपण घ्यावयाचें, इतर मुलांचे मनावर परिणाम होईल असा व्यूह रचून त्यांत त्यांची एकाग्रता बनवावयाची असा त्यांचा सारा वेळ उद्योग चालू असे. ज्या समुदायात महंमद अली नाहीं त्या खेळास रंग कधींच भरावयाचा नाहीं. या खेळाडू वृत्तीनें त्यांचें शरीर मजबूत व बांधेसूद बनलें.

आईबाप व वडील माणसें यांची आज्ञा पाळणें हाच सर्वांचा खरा धर्म आहे असें महंमद अलीला बालपणींच समजल्यानें ते नेहमीं आपल्या आईच्या आज्ञेप्रमाणें वागत. एकंदरींत सुंदर व बळकट शरीर, आनंदी व खेळाडू वृत्ति, हुपारी, आज्ञाधारकपणा,

इत्यादि सद्गुणांमुळें ते वाळपणीं सर्वांचे फारच आवडते झाले. उच्च विचार, थोर मन, करारी स्वभाव अशा मातेच्या तालमींत ज्या महंमद अलींचें वाळपण गेलें तें मूल पुढें थोर पुरुष म्हणून नांवालौकिकास आल्यावांचून कसें राहील?

---

## प्रकरण २ रें.

## शिक्षण.

महंमद अली पांचसहा वर्षांचे झाल्यानंतर त्यांच्या मातोश्री अबादिबानूनें त्यांना रामपूर येथें प्राथमिक शाळेंत शिक्षणासाठीं घातलें. ते जात्या बुद्धीनें तरतरीत होते. महंमद अलींची बुद्धिमत्ता पाहून शिक्षकहि आश्चर्यानें थक्क होऊन जात. तेहि आपल्या गुरुजींच्या सांगण्याप्रमाणें वागत व वेळच्यावेळीं नेमून दिलेला अभ्यास मन लावून करीत असत; त्यामुळें त्यांच्यावर गुरुजींचें फार प्रेम असे. यावरून महंमद अलींच्या ठायीं विद्यार्थिधर्म पूर्णपणें वसत होता, हें कबूल केलें पाहिजे.

प्राथमिक शिक्षण उत्तमप्रकारें संपादन केल्यावर ते बरेली येथील हायस्कुलांत दाखल झाले व तेथें इ. स. १८९५ पर्यंत इंग्लिश अभ्यासक्रम पुरा करून शेवटीं ते मॅट्रिकच्या परिक्षेंत पास झाले. त्यानंतर उच्च शिक्षण घेण्यासाठीं महंमद अलींनीं कॉलेजमध्यें जाण्याचें ठरविलें आणि त्याप्रमाणें आपल्या ज्ञानार्जनाची हौस पूर्ण करण्यासाठीं ते थेट अलीगड येथें निघून गेले एकंदरींत महंमद अलींना शिक्षणाबद्दलची किती आस्था होती हें स्पष्ट होतें.

अलीगड येथील कॉलेजांत असतांना आपल्या अचाट बुद्धिकौशल्यानें ते अल्पावधींतच सर्वांच्या परिचयाचे बनले. त्यांचा

स्वभाव आनंदी व मनमिळाऊ असल्यामुळं कॉलेजांतील प्रत्येक विद्यार्थ्यास ते प्रिय वाटूं लागले ! कॉलेजचा अभ्यास संभाळून फावल्या वेळीं वर्तमानपत्रें, मासिकें व इतर चांगलीं पुस्तकेंही ते वाचीत असत. या वाचनानें त्यांच्या विचारास उच्च वळण लागलें. दिलेल्या विषयावर वाचनाच्या अभ्यासामुळें ते मुद्देसूद भाषणहि करीत. त्यांचा आवाज जात्याच गोड व गंभीर होता. कॉलेजमध्यें होणाऱ्या सभांतून त्यांचीं वेळोवेळीं भाषणें होऊं लागलीं. भाषणांतील विषयांची मांडणी पद्धतशीर असल्यानें श्रोतृगण तल्लीन होऊन जात असे. महंमद अली हे उत्कृष्ट कवीहि होते. त्यांच्या कवितेंत अर्थगांभीर्य व विनोद असे. त्यामुळें त्यांच्या कविता सर्वांनाच आवडत होत्या. त्यांनीं या वयांत व पुढें निरनिराळ्या प्रसंगास अनुसरून ज्या पुष्कळ कविता केल्या आहेत. त्यांत ईश्वर, पैगंबर महंमद साहेब, कर्बला, कॉलेजची सुट्टी या विषयावर विशेष चटकदार काव्य केलें +आहे. आधुनिक कवींमध्यें जौहर, या टोपण नांवानें ते प्रसिद्ध आहेत.

महंमद अलींच्या बुद्धिमत्तेंत अशा प्रकारच्या नवीन कलेची भर पडल्यानें ते सर्व विद्यार्थ्यांमध्यें फारच पुढें गेले ! इतकें कीं, त्या वेळीं कॉलेजमध्यें महंमद अलींच्या तोडीचा एकही विद्यार्थी नव्हता असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशाप्रकारें अलिगड कॉलेमध्यें त्यांनीं अति हुषार विद्यार्थी म्हणून नांव मिळविलें. आणि बी. ए. ची पदवी मिळविल्यानंतर त्यांनीं अलीगड सोडलें.

कॉलेजचें शिक्षण संपादून ते रामपूर येथें येऊन राहिले. हिंदुस्थान हा देशच दरिद्री ! बुद्धिवान माणसाला बुद्धिविकासनाच्या मार्गांत अनेक विघ्नें यावयाचींच ! ! त्यांतूनहि धडाडीनें एकादाच विद्यार्थी यशस्वी होऊन बाहेर पडावयाचा. मौलाना महंमद अली यांची ही अशीच स्थिति झाली. विलायतेस जाऊन उच्च शिक्षण घेण्याची पुष्कळ मनीषा असतांही आर्थिक अडचणीमुळें हें शक्य नाहीं असें

+ परिशिष्ट अ पहा.

स्पष्ट दिसत होतें. ' मनसा चिंतयेत् कार्यं दैवमन्यत्र चिंतयेत् ' असा न्याय सर्वत्र आढळतो. परंतु इच्छा अनावर झाली म्हणजे कर्मधर्मसंयोगानें अनपेक्षित अशा गोष्टी सहज घडून येतात. या वेळीं रामपूर संस्थानाधिपति नवाब महंमद इसहाकखां हे असून त्यांचे ठायीं शिक्षणाभिरुचि व आस्था विशेष होती. महंमद अलींच्या बुद्धिमत्तेचा लौकिक त्यांचे कानावर गेला. तेव्हां त्यांना मोठा आनंद वाटून लागलींच त्यांनीं महंमद अलीस बोलावून घेतलें. आणि इंडियन सिव्हिल सार्व्हस ( आय्. सी. एस्. ) परिक्षेस त्यांना विलायतेस पाठविण्याचें ठरविलें. व आपल्या संस्थानाकडून मोठी स्कॉलरशिपही दिली. इतकें झाल्यानंतर ते ऑक्सफोर्डला निघून गेले. या युनिव्हर्सिटींत इ. स. १८९८ ते १९०२ पर्यंत त्यांनीं शिक्षण घेऊन सृष्टिशास्त्र, रसायनशास्त्र, जंतुविज्ञानशास्त्र, अध्यापनशास्त्र इत्यादि आवडत्या विषयांत प्रावीण्य मिळविलें आणि सतत प्रयत्न करून बुद्धिमत्तेच्या जोरावर त्यांना तेथील बी.ए.ची पदवी सन्मानासहित मिळाली. देतां आल्यास आय. सी. एस्. ची परीक्षाहि देण्याचा त्यांचा विचार होता, परंतु या क्लासांत असतांना त्यांचा सगळा वेळ निरनिराळे ग्रंथ व वर्तमानपत्रें वाचण्यांत जात असे. त्यामुळें त्यांच्या हातून व्हावा तसा कसून प्रयत्न झाला नसल्यानें सदर परिक्षेंत त्यांना यश आलें नाहीं. यावर विचार करून पाहतां असेंच म्हणतां येईल कीं, आय. सी. एस्. परीक्षा नापास करण्यामध्यें ईश्वराचा तरी निराळा हेतु असला पाहिजे. मौलाना महंमद अली सदरचे परिक्षेंत पास झाले असते तर ते कलेक्टर किंवा दुसरे मोठे सरकारी अधिकारी झाले असते व फार तर स्वतःच्या कुटुंबाची आर्थिकदृष्ट्या त्यांना सुधारणा करतां आली असती ! परंतु नोकरींत राहून त्यांना आपल्या देशबांधवांची व देशाची मनाप्रमाणें सेवा करण्यांत बरेच अडथळे आले असते.असो.

जरी ते आय. सी. एस. परिक्षेंत नापास झाले तरी स्वदेशसेवा, धार्मिक सेवा व जनसेवा या परिक्षेंत पूर्णपणें पास झाले हें त्यांच्या चरित्राच्या पुढील प्रकरणांवरून आपल्या सहज निदर्शनास येईलच.

---

प्रकरण ३ रें.

## नोकरी.

मौ. महंमद अली हे इंग्लंडमध्यें शिक्षण घेत असतां त्यांची बुद्धिमत्ता व कर्तबगारी हीं बडोदाधिपति श्रीमंत सरकार सयाजीराव गायकवाड यांचे निदर्शनास आली. स्वत: महाराज हे विद्वानांचे चहाते व पुरस्कर्ते असल्यानें त्यांचें मौ. महंमद अलीवर प्रेम जडलें. पुढें ते शिक्षण संपादन करून इ.स. १९०२मध्यें हिंदुस्थानांत परत आले. त्या वेळीं बडोदाधिपति यांनीं मौ. महंमद अलींना आपल्या संस्थानांतील सिव्हिल सर्व्हिस खात्यावर मुख्य अधिकारी नेमिलें. तसेंच अफूचेंहि खातें त्यांच्या स्वाधीन केलें गेलें. या जागेवर असतांना त्यांनीं तें काम फारच काळजीनें केलें. त्यामुळें अफूच्या उत्पन्नांत पूर्वीपेक्षां बावीसपट वाढ झाली. हें पाहून बडोदा संस्थानाचे राजेसाहेब त्यांच्यावर फारच खूष झाले, आणि त्यांनीं महंमद अलींना योग्य मोबदला दिला. पुढें बडोदा संस्थानाधिपतींनीं त्यांना नवसारीचे कमिशनर केलें. त्याप्रमाणें त्या जागेवर ते रुजूं झाले. आतां ते मोठे अधिकारी होते, तरी त्यांना गर्वाची बाधा मुळींच झाली नाहीं. त्यामुळें त्यांच्याकडून कोणासहि त्रास झाला नाहीं. जें सरळ व योग्य दिसेल तें करण्याचें महंमद अलींनीं कधींहि टाळलें नाहीं. ते कामासाठीं फिरतीवर जात त्या वेळीं जेथें जेथें त्यांचा मुक्काम पडेल तेथें तेथें लोकांच्या अडचणी काय आहेत

हें समक्ष पाहात आणि समजावून घेत. दौऱ्यावर असतांना त्यांनीं कोणावर कोणत्याही प्रकारचा बोजा घातला नाहीं. ते सतत आपल्या कामांत दंग असत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे मौ. महंमद अलींचें लक्ष रयतेच्या अडचणी दूर करण्याकडेच विशेष असे. त्यामुळें ते लौकरच अतिशय लोकप्रिय झाले व त्यांच्या या चोख कामगिरीबद्दल त्यांना सर्वजण दुवा देऊं लागले.

ते नोकरी संभाळून फावल्या वेळीं लेखहि लिहून मोठमोठ्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध करीत. या लेखांत विशेषतः शिक्षणविषयक मजकूर असे व तो हिंदुमुसलमानांना उद्देशून लिहिलेला असे.

मौ. महंमद अलींच्या सुव्यवस्थित कार्याची प्रसिद्धि सर्व गुजराथ व काठेवाडांत झाली. पुढें कांहीं दिवसांनीं राजकोट येथील राजकुमार कॉलेजकडून त्यांना आमंत्रण आलें. पूर्वीपासून त्यांचें लक्ष शिक्षणाकडे फार असे. शिवाय लिहिणें, वाचणें, अध्यापन इत्यादि विषय त्यांच्या आवडीचे होते. कमिशनरच्या हुद्यापेक्षा महंमद अलींना शिक्षणाधिकारी होणें अधिक पसंत पडलें. लागलीच त्यानीं तें आमंत्रण आनंदानें स्वीकारलें व महाराजा बडोदा यांना कळवून ते राजकुमार कॉलेजचे व्हाइस-प्रिन्सिपाल होण्यासाठीं तयार झाले.

मौलाना महंमद अली कमिशनरचे जागेवर असताना त्यांना भरपूर पगार मिळत होता, कोणत्याही गोष्टीची कमतरता नव्हती, मानमरातबही वरच्या दर्जाचा होता, त्यांनीं वाटेल तो पगार मागितला असतां तर महाराज बडोदाधिपति यांनीं दिला असतां, मनांत आणलें असतें तर ते संपत्तीनें कुबेरही बनले असते; परंतु मौ. महंमदअली संपत्तीचे भुकेलेले नव्हते, त्यांना मानमरातब अथवा ऐषारामाची हौस नव्हती. या सर्व लोभाच्या गोष्टींना त्यांनीं दूर लोटून दिलें, आणि शिक्षणासारख्या पवित्र क्षेत्रांत प्रवेश केला.

हिंदुस्थानांत जे अनेक देशभक्त व पुढारी आतांपर्यंत होऊन गेले

त्या बहुतेकांनीं वरीलप्रमाणेंच अध्यापकाचें काम केल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. देशांतील जनतेला त्यांनीं आपल्या पुढील आयुष्यांत ज्या गोष्टींचें शिक्षण दिलें त्याचा जणूं पायाच अशा रीतीनें रचला गेला असें म्हणण्यास हरकत नाहीं. कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर, गोपाळ गणेश आगरकर, लो० बाळ गंगाधर टिळक यांनीं स्वप्रयत्नानें स्वतंत्र शिक्षणसंस्था काढून तींत त्यांना प्रत्यक्ष अध्यापकाचें काम करावें लागलें, व पुढें हीं मासिकें-वर्तमानपत्रें इत्यादि अन्य प्रकारांनीं जनतेला शिक्षण देण्याचें कार्य केलें. लाला लजपतराय यांचीही अशीच गोष्ट ! कै. ना. गोपाळ कृष्ण गोखले यांनाही शिक्षक व्हावें लागलेंच होतें. आणि आजच्या विद्यमान पुढाऱ्यांत ना० श्रीनिवास शास्त्री हेही एका काळीं शिक्षक म्हणून नांवाजलेले होते. त्याचप्रमाणें बाबू विपिनचंद्र पाल हेहि शिक्षकच होते. पंडित मदन मोहन मालवीय यांनीं तर इ० स० १८८१ ते १८८७पर्यंत सरकारी हायस्कूलमध्यें शिक्षकाचें काम केलें आहे. यावरून विद्यार्थ्यांचा शिक्षक, पुढें राष्ट्राचाही शिक्षक होऊं शकतो असें विधान करण्यास प्रत्यवाय नाहीं.वरील मालिकेंत मौलाना महंमद अलींची गणना झाली असल्यास आश्चर्य असें कांहींच नाहीं.

मौलाना महंमद अली यांनीं राजकोट येथें जाऊन राजकुमार कॉलेजमधील व्हाइस-प्रिन्सिपॉलच्या जागेचा चार्ज घेतला. थोड्याच अवधींत तेथें आपल्या विद्वत्तेच्या तेजानें ते चमकूं लागले. त्यांच्या ज्ञानाचा फायदा सर्व राजकुमारांना मिळूं लागला. अशाप्रकारें मौ. महंमद अली जरी सरकारी नोकरींत होते, तरी आज सरकारी नोकर ज्या प्रकारच्या बंधनांनीं जखडले गेले आहेत तशी स्थिति त्या वेळीं नव्हती. सरकारी नोकरांनाही सार्वजनिक कार्यांत उघडपणें भाग घेतां येत असे. मौ० महंमद अली राष्ट्रीय कॉंग्रेस अधिवेशनास हजर राहात असत. तसेंच लेखनद्वारां लोकजागृतीचें कार्यही

त करीत असत. या दृष्टीनें त्यांना राजकुमारकॉलेजांतील शिकविण्याचें क्षेत्रही अपुरें वाटूं लागलें. त्यामुळें त्यांना चैन पडत नसे. त्यांच्या बुद्धिमत्तेचा लौकिक सर्वत्र वाढल्यानें मौ० महंमद अलींना जावरा संस्थानचे नवाब साहेबांनीं आपल्या संस्थानचे दिवाण होण्याबद्दलही कळविलें. पण त्यांनीं या गोष्टीस कबूली दिली नाहीं. मौ. महंमद अलींना आपल्या इच्छेप्रमाणें नोकरींत राहून जनसेवेचें कार्य मोकळेपणानें करतां येईना, त्यांना कोंडल्यासारखें वाटूं लागलें, तेव्हां सहजच दुसऱ्याची ताबेदारी करण्यांत कांहींच अर्थ नाहीं अशी त्यांची ठाम समजूत झाली आणि स्वावलंबी बनण्याचे विचार त्यांचे मनांत घोळूं लागले.

---

प्रकरण ४ थें.

## लोकसेवा.

मौलाना महंमद अलींना आतांपर्यंतच्या कर्तबगारींत आर्थिक फायदा झाला. श्रमकार्य करून प्रपंचहि सुव्यवस्थित थाटतां आला. परंतु आत्मिक तळमळ, त्यांचें विचाररूपी तारूं अन्य दिशेकडे वाहून नेत होती.

हिंदुस्थानांतील शिक्षण, राष्ट्रीय भावनाजागृतीस मदत करीत नाहीं, त्यांत फरक झाला पाहिजे, याबद्दल सर्व राष्ट्रधुरिणांचें मतैक्य आहे. या पद्धतिविरुद्ध पुष्कळ ओरड आजपर्यंत चालू आहे. लोकमान्य टिळकांनीं इ. स. १९०६ मध्यें राष्ट्रीय शिक्षणाविषयीं पुढील उद्गार काढले आहेत. " देशांतील तरुण पिढी देशाचे राजकीय,औद्योगिक व सामाजिक हक्क राखण्यास किंवा वाढविण्यास समर्थ होईल, अशाप्रकारें तीस शिक्षण देणें हें देशांतील विद्या-

खात्याचे कर्तव्य आहे आणि त्यासच राष्ट्रीय शिक्षण म्हणतात. आपल्या जवळचे देश काय करीत आहेत, कोणत्या बाबतींत अगर विषयात त्यानीं पुढें सरसावण्याचा उद्योग चालविला आहे, याचा देशातील विद्याखात्यानें नीट विचार केला पाहिजे व त्याप्रमाणें आपल्या देशातील शिक्षणक्रमात आमूलाग्र सुधारणा केली पाहिजे. सर्व राष्ट्र किंवा सर्व प्रजा आहे त्यापेक्षा अधिक सुखी कशानें होईल त्यास मिळत आहे त्यापेक्षा अधिक अन्न कशानें मिळेल, तें स्वाभिमानी, निश्चयी, करारी व तेजस्वी कशानें होईल हें सरकारनें पाहिलें पाहिजे आणि जे सरकार या गोष्टींकडे लक्ष देत नाहीं तें भाडोत्री व आपमतलबी समजलें पाहिजे.

वरील प्रकारची लो० टिळकाची विचारसरणी सर्व राष्ट्रहित साधणाऱ्या पुढाऱ्याच्या मनात वावरत होती. मौ० महमद अली हे शिक्षक होते. अर्थात् ही विचारसरणी त्याना पटल्यावाचून कशी राहील ! त्यानीं यापुढील ध्येय लोकसेवेंत घालविण्याचें ठरवून राजकुमारकॉलेजच्या जागेचा राजीनामा दिला व ते कलकत्ता शहरीं निघून गेले.

कलकत्ता शहरीं आल्यानतर लोकसेवा करण्यासाठीं काय केलें पाहिजे, आपले विचार बहुजनसमाजापुढें कसें माडता येतील ह्याचा मौलाना महमद अली विचार करू लागले. ते इंग्लडमध्यें अभ्यास करीत असताना हिंदुस्थानातील लोकस्थिति सुधारणेस काय करणें जरूर आहे, आपल्या देशाला स्वतंत्र करण्याचा मगल दिन केव्हा येईल व मी त्यात कर्धी भाग घेईन इत्यादि गोष्टींचे विचातरंग वारंवार त्याच्या अंत करणात उद्भवत असत.

या त्याच्या उदात्त हेतूला, लोकसेवेच्या आखाड्यात उतरताच नवीन जोम उत्पन्न झाला स्वत वरील विषयावर लेख लिहून तत्कालीन वर्तमानपत्रामध्यें ते आपले विचार प्रकाशित करूं

लागले. हे विचार प्रकाशित करण्यानें लोकांच्या मतें उत्तम लेखक म्हणून मौ. महंमद अली प्रसिद्धीस आले हें खरें, परंतु त्यांच्या मनाप्रमाणें भरीव कार्य कांहींच घडून आलें नाहीं. अशा अवस्थेंत मौ० महंमद अलींना लोकसेवा करण्याची योग्य संधि लाभली. लागलींच त्यांनीं आपल्या जबाबदारीवर कलकत्ता शहरीं 'कॉमरेड' नांवाचें इंग्रजी भाषेंत एक वर्तमानपत्र सुरू केलें.

वृत्तपत्राचा संपादक हाही एकप्रकारें शिक्षकच असल्यानें मौ० महंमद अलींनीं सदर पत्राच्या संपादकत्वाचें काम मोठ्या हौसेनें व कळकळीनें करून दाखविलें. त्यांचे लेख दणदणीत व उपयुक्त असे प्रसिद्ध होत असल्यानें थोड्या दिवसांत 'कॉमरेड' पत्रावर लोकांची भक्ति बसली आणि त्यांची भाषाशैली व विषयांची योग्य निवड यांजबद्दल देशीं व विदेशीं वाहवा होऊं लागली. त्यांच्या लेखांनीं लोकांच्या मनांत विद्येची आवड उत्पन्न झाली. त्यांना आपल्या चालू स्थितीचें चित्र डोळ्यांसमोर दिसूं लागलें. जगांतील इतर देशांच्या मानानें आपला देश किती मागें आहे, हें कळूं लागलें. इंग्लंड, अमेरिका, जपान, फ्रान्स, जर्मनी या राष्ट्रांतील उद्योगधंद्यांची थोडीशी ओळख पटली. तसेंच तेथील रहिवाशांच्या कलाकौशल्याच्या वस्तु पाहून त्या आपल्या देशांतही तयार व्हाव्यात, असें लोकांच्या मनावर ठसलें गेलें. हिंदुस्थानांतील मोठमोठ्या धनिकांनीं नुसत्या पैशाचाच संग्रह करीत बसूं नये. त्यांनीं त्याचा उपयोग उद्योगधंदे व कारखाने काढण्याकडे करावा. व अशा रीतीनें देशांतील लोकांचें दारिद्र्य नाहींसें करावें या अर्थाचेही त्यांत लेख असत. सारांश, लोकसेवेसंबंधानें त्यांना जें जें करतां आलें तें तें त्यांनीं केलें. मग त्यांत कोणासही वरें वाटो किंवा वाईट वाटो, त्याची मौ०महंमद अलींनीं मुळींच पर्वा केली नाहीं. या

लोकसेवेच्या कार्याबद्दल सर्वांना समाधान वाटलें व सरकारी अधिकारीवर्गही त्यांचा योग्य असा गौरव करूं लागला.

असा हा क्रम मौ. महंमद अलींनीं सतत चालू ठेविला. पुढें ब्रिटिश सरकारनें कलकत्ता येथून आपलें ठाणें उठविलें व तें दिल्ली येथें नेलें. त्या वेळीं मौ० महंमद अलींनींही आपलें कलकत्तायेथील ठिकाण बदललें आणि ते दिल्लीसच येऊन राहिले. दिल्ली व त्याच्या आसपास पंजाब, सिंध वगैरे ठिकाणीं उर्दू भाषा-प्रामुख्यानें चालत असल्यामुळें 'कामरेड' पत्राचा खप फारच कमी होऊं लागला. तेव्हां त्यांनीं ही अडचण नाहींशी होण्यासाठीं 'हमदर्द' नांवाचें उर्दू दैनिक पत्र सुरूं केलें. प्रथमारंभीं या पत्रांतील मजकूर उर्दू टाइपांत छापला जात असे परंतु त्याचा खर्च भागेना. शिवाय तें महागही पडूं लागलें. म्हणून गोरगरिबांना तें विकत घेण्याची अडचण पडूं लागली. हें लक्षांत येतांच चाणाक्ष मौ० महंमद अलींनीं थोड्या खर्चांत छापण्याची तजवीज केली. आणि 'हमदर्द' हें पत्र शिलाप्रेसवर निघूं लागलें. त्यामुळें पूर्वींपासून चालत असलेल्या इतर वर्तमानपत्रांचा खप जेमतेम होऊं लागला व मौ० महंमद अलींचे ' हमदर्द ' वर्तमानपत्र घेण्याकडे लोकांची प्रवृत्ति अधिकाधिक वाढूं लागली. इतकीं कीं, हलक्या मजुरापासून तों थेट 'श्रीमंतांच्या कनिष्ठ नोकरापर्यंत तसेंच वरिष्ठ अमलदाराच्या हातांतही तें पत्र फडफडूं लागलें.

पुढें इ० स० १९०६ मध्यें मुस्लीम लीगची स्थापना झाली. त्या वेळीं तिचे ते पुरस्कर्ते होते. तसेंच त्यांनीं अलीगड कॉलेजला अलीगड युनिव्हर्सिटी करण्याकरितां सर आगाखान यांच्या बरोबर देशभर दौरा काढला आणि २५ लाख रुपये जमा करून तें काम शेवटास नेलें. याशिवाय महात्मा गांधींबरोबर हिंडून त्यांनीं स्वराज्यफंडासाठीं पुष्कळसा पैसाहि जमा केला.

या सर्व कार्यांमुळें मौ० महंमद अलींनाही अधिक प्रोत्साहन मिळून ते लोकसेवेंत आनंदानें अधिकाधिक भाग घेऊं लागले.

---

## प्रकरण ५ वें

# धार्मिक कार्य

ज्याला लोकसेवा करण्याची मनापासून आवड आहे, त्याला ईश्वराचेंही सहाय्य असतें व अशांना कोणत्याही चांगल्या कामांत यश मिळतें. मौलाना महंमद अलींच्या मातेनें त्यांना पूर्वींपासूनच इस्लामी धर्माचें शिक्षण देण्याची तजवीज केली होती. त्यामुळें त्यांची आपल्या धर्मावर पूर्ण निष्ठा होती. ते इंग्लंडांत होते तरीसुद्धां आपल्या धर्माप्रमाणें वागत. रमजानचे महिन्यांतील सर्व उपवास ठेवीत. अशा प्रकारें ईश्वर व त्याचे पैगंबर हजरत महंमद (स्व० ) साहेबांचे सर्व हुकूम पाळीत. ते खरे धर्मवीर होते. इस्लामधर्माविरुद्ध कोणी अन्याय केला तर तो त्यांना मुळींच सहन होत नसे. एकदां कानपूर येथील मच्छलीबाजार माशिदीसंबंधानें असाच वादग्रस्त प्रसंग ओढवला. त्या मशिदीपुढें सडकेच्या मधोमध एक पाण्याचा हौद होता. त्या हौदांत मुसलमानी धर्माप्रमाणें वजू ( तोंड, हात, पाय वगैरे धुणें ) करून लोक नमाज पडण्यास जात. तो हौद काढून रस्ता मोठा करावा अशी योजना सरकारच्या मनांत आली. तत्पूर्वी माशिदींतील कांहीं व्यवस्थापकांची त्यांनीं कबूलीही घेतली होती व कामास सुरुवात केली ही बातमी हां हां म्हणता सर्व शहरभर पसरली. इतर मुसलमानबंधूंनीं त्या कामास हरकत केली. या प्रकरणाबाबत निरनिराळ्या पत्रांतून बातम्याही प्रसिद्ध होऊं लागल्या. यामुळें मौ. महंमद अलींचें लक्षही

तिकडे वेधलें. तेव्हां त्यांनीं चटकन या धार्मिक कार्यांत आपलें पाऊल पुढें ठेविलें. स्वतःच्या 'हमदर्द' पत्रांतून त्या संबंधानें सणसणीत लेख लिहिले. त्यायोगें इतर ठिकाणच्या मुसलमानबंधूंच्या मनांत सदर अन्यायाचें बीजारोपण होऊन तेही या कामीं शक्य ती मदत करण्यास सिद्ध झाले. एक एक जमतां जमतां हजारों मुसलमान कानपुरांत एकत्र झाले. स्वतः मौ. महंमद अलीही या वेळीं हजर राहिले. याबद्दल सर्वजणांनीं पुढें काय करावें,याचा विचारविनिमय केला. त्यांत ज्यांनीं हा हौद काढून रस्ता रुंद करावा असा हुकूम दिला होता त्यांच्याकडे प्रथम कांहीं प्रमुख मुसलमानबंधु दाद मागण्यास गेले, परंतु त्यांचें म्हणणें कोणी ऐकिलें नाहीं. तेव्हां निराश न होतां मौ०महंमद अलींनीं हें धार्मिक कार्य दुप्पट उमेदीनें करण्याचा पुढाकार घेतला व लागलींच सय्यद वजीर हुसेन यांच्यासह त्यांनीं थेट इंग्लंडचा रस्ता सुधारला. तेथें भारतमंत्री व इतर मोठमोठ्या लोकांच्या भेटी घेतल्या व या प्रकरणासंबंधीं त्यांना पटेल अशा भाषेंत आपला हेतु समजावून दिला. अखेर इंग्लंडहून शिफारसपत्र मिळवून ते परत हिंदुस्थानाकडे वळले. या वेळीं हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लार्ड हॉर्डिज साहेब हे होते. त्यांना तें शिफारसपत्र दाखविलें. अखेर मोठ्या मुष्किलीनें मौ० महंमद अलींच्या म्हणण्यास त्यांनीं मान्यता दिली.

अशा प्रकारें इतरांचे दृष्टीनें लहानसें परंतु धार्मिक दृष्ट्या महत्त्वाचें असें हें कार्य दीर्घ प्रयत्न करून या धार्मिक कार्यांत त्यांनीं यश संपादन केलें. आणि मशिदीच्या हौदाचा निकाल मुसलमानांसारखा करवून घेऊन हौद जेथल्या तेथेंच कायम ठेविला.

मौ० महंमद अलींचें धार्मिक कार्य आपल्या देशापुरतेंच आकुंचित नव्हतें. ते जगांतील इतर इस्लामी राष्ट्राकडेही प्रेमानें

ढोंगी आणि मतलबी होते. धर्मभोळ्या मुसलमानाना निरनिराळ्या थापा देऊन तेथील मुसलमानांवर त्यानीं स्वताचा अंमल बसविण्याचा उपक्रम चालविलेला होता. अशा प्रकारें अरबस्तानमधील मक्का व मदीना या पवित्र शहरांवर अम्मल चालू केल्याची वार्ता मौ० महंमद अलींच्या कानावर गेली. त्यांतच शरीफ हुसेन्संबंधानें वऱ्यावाईट बातम्याही बाहेर येऊं लागल्या. या बातम्याना सुलतान इबने सऊद यानीं उचलून घरिलें. आणि शरीफाला काढून टाका व सर्व व्यवस्था जगातील प्रमुख मुसलमानाच्या हातीं द्या असें त्यानीं ठरविलें. या कामीं मौ० महंमद अलींकडे शरीफ हुसेनला काढून टाकूं नये अशाबद्दल पुष्कळ प्रयत्न झाले, पण त्याचा कांहीं एक उपयोग न होता मौ० महंमद अलींनीं सुलतान इब्नें सऊदला मदत देऊन शरीफ हुसेनला काढून टाकिलें.

ठरल्याप्रमाणें पुढें सुलतान इब्ने सऊदनीं आपले वचन पाळलें नाहीं. धार्मिक क्षेत्राची व्यवस्था जागतिक इस्लाम कमिटीकडे न देता ती त्यानीं आपल्याचकडे ठेविली व पुढें मनास येईल तसे ते वागूं लागले. हें पाहून मौ. महंमद अलींचें मन फार उद्विग्न झालें. आणि मदीनाशहरीं पैगंबर महंमद ( स्व. ) साहेबाच्या कबरीवर जाऊन तेथ दीन वाणीनें त्यानीं परमेश्वराची पुढीलप्रमाणें प्रार्थना केली. ' तींत खिलाफत पूर्ववत् स्थापन होऊं दे व त्याची व्यवस्था पूर्वीच्या नियमाप्रमाणें निवडून येतील त्या पंच कमेटीच्या देखरेखीखालीं चालूं दे ' अशी पैगंबरातर्फे मागणी केली.

पुढें मौ. महंमद अली हिंदुस्थानात परत आले आणि हा खिलाफतीचा प्रश्न हातीं घेऊन ते देशभर फिरत राहिले. या चळवळींमुळे तुर्कस्तान व जर्मन या राष्ट्राशीं मौ० महंमद अलींचा संबंध जुळला हें ब्रिटिश अधिकाऱ्यांना आवडलें नाहीं, व ती चळवळ दाबून पाडण्याचे प्रयत्न सुरू झाले.

प्रकरण ६ वें

# हिंदुमुसलमानांचें ऐक्य.

तुर्कस्तान व बाल्कन युद्ध संपलें. त्यानंतर इ. स. १९१४ मध्यें युरोपचें महायुद्ध सुरू झालें. या युद्धांत पाश्चिमेकडील बहुतेक राष्ट्रें क्रमाक्रमानें गोंवलीं गेलीं. ब्रिटिश सरकारनेंही दुर्बल राष्ट्राच्या संरक्षणाकरितां रणक्षेत्रांत उडी घेतली.त्याविरुद्ध जर्मनीनें ब्रिटिशांशीं शत्रुत्व पत्करिलें. त्याला तुर्कस्ताननें साह्य केलें. यामुळें ब्रिटिश सरकारचा तुर्कस्तानवर रोष राहिला.अशांतच मौ० महंमद अलींनीं तुर्कस्तानास मदत करण्याचें ठरविलें व त्यासंबंधानें सर्व मुसलमानांना उद्देशून एक लेख लिहिला. आणि तो 'कामरेड' व 'हमदर्द' या पत्रांतून प्रसिद्ध केला. ही गोष्ट ब्रिटिश अधिकाऱ्यांना मुळींच आवडली नाहीं व त्याबद्दल इ. स. १९१४ मध्यें त्यांना कसबे मेहरवली येथें नजरकैद करून त्यांच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवण्यांत आला आणि त्यांना आरंभीं छिंदवाडा व नंतर बैतूल येथील जेलमध्यें ठेविलें. त्यामुळें मौ. महंमद अलींचीं दोन्हीं वर्तमानपत्रें बंद पडलीं.

या वेळीं हिंदुस्थाननें साम्राज्यसरकारला मदत करण्याचें ठरविलें, आणि तुर्कस्तान हें राष्ट्र युद्धांत साम्राज्यसरकाराविरुद्ध असतांही हिंदुस्थानांतील मुसलमान ब्रिटिश सरकारशीं राजनिष्ठ राहिले. इतकेंच नव्हे तर सर्व हिंदी राष्ट्रानें एकदिलानें आर्थिक व मनुष्यबळानें सरकारास मोठीच मदत केली. हिंदुस्थानांतून या युद्धाप्रीत्यर्थ चार वर्षांत ११६१७७९ नवे सैनिक सैन्यांत सामील होऊन त्यांतून १२१५३३८ सैनिक रणांगणावर गेले. त्यांतले १०१४३९ इसम धारातीर्थीं पतन पावले! अखेर दोस्त राष्ट्रांस

जय मिळाला.हिंदुस्थानामधील प्रजाजनांनीं राजनिष्ठा दाखविल्याबद्दल इंग्रजें सरकारनें सन्मानपूर्वक त्यांचा गौरव केला!

महायुद्धाच्या सुरवातीपासून मौलाना महंमद अलींना तुरुंगांत अडकवून ठेविलें होते. त्याच्या बरोबर त्यांचे बंधु मौ० शौकत अलीही तुरुंगांत होते. अलीबंधूंच्या मुक्ततेबद्दल कलकत्ता कॉंग्रेस-मध्यें लो० टिळक यांनीं ठराव मांडला व त्यांनीं त्यांची अटक अन्यायी कशी आहे तें सांगितलें. त्यावर जमनादास द्वारकादास, सत्यमूर्ती वगैरेंचीं भाषणें होऊन हा ठराव पास झाला.

त्या वेळीं सरकारनें कांहीं अटींवर अलीबंधूंना सोडून देण्याचें ठरविलें. व त्या अटीही त्यांना कळविल्या. परंतु मौ० महंमद अलींनीं त्या मुळींच मानिल्या नाहींत.उलट त्यांना त्या कामीं त्यांच्या मातोश्रीनें उत्तेजनच दिलें. पुढें महायुद्ध समाप्त होऊन चोहोंकडे शांतता झाली तेव्हां सरकारनें उभयतां बंधूंना बिनशर्त सोडून दिलें.

इ०स०१९१७मध्यें मौ०महंमद अलींची सुटका झाली,त्या वेळीं ते हिंदी राष्ट्राचे इतके परिचित बनले कीं, अमृतसर येथें राष्ट्रीय कॉंग्रेस व मुस्लीम लीगच्या चालू असलेल्या सभांच्या पुढाऱ्यांनीं त्यांचें उत्तम प्रकारें स्वागत केलें. तेथें महंमद अलींनीं प्रमुख देश-भक्तांच्या भेटी घेतल्या आणि दोन्ही सभांमध्यें स्वातंत्र्य व खिलाफत यासंबंधानें आपले विचार निर्भीडपणें प्रतिपादिले. अशा प्रकारें मौ० महंमद अलींनीं राजकारणी पुरुष या नात्यानें पुष्कळच काम-गिरी केली, हें नाकबूल करतां येणार नाहीं. या वेळीं हिंदुस्थानांत स्वराज्यसंघाची चळवळ सुरू झाली. लो० टिळक व डॉ० अनि बेझंट यांनीं सदर चळवळीचें पुढारीपण पतकरिलें व सर्व देशभर स्वराज्याचा नाद दुमदुमूं लागला.या देशभर पसरलेल्या लाटीबरोबरच मौ०महंमद अलीही वाहूं लागले.आणि आपल्या हिंदभूमीस गुलाम-गिरींतून मुक्त करून स्वातंत्र्य मिळवून देण्याचे कामीं हिंदु व मुस-

लमानांनीं मिळून कसून प्रयत्न करावा असा ठराव संघापुढें मांडला. त्या वेळीं या ठरावास सर्वांनीं कबूली दिली.

यानंतर सर्व देशभर ठिकठिकाणीं कॉंग्रेस-कमिट्या स्थापन करण्यांत आल्या, आणि या संस्थांतर्फे हिंदुमुसलमानांच्या पुढीलप्रमाणें मागण्या सरकारकडे होऊं लागल्याः—

( १ ) वीस वर्षांच्या आंत संपूर्ण जबाबदारीचें स्वराज्य हिंदुस्थानला देऊं अशी हमी दिली पाहिजे.

( २ ) हिंदी लोकांना मुल्की व लष्करी शिक्षण देण्यांत येऊन त्यांत ते पास झाल्यास या दोन्ही शाखांत निम्या जागा देण्यांत आल्या पाहिजेत.

( ३ ) हिंदुस्थानच्या कार्यकारी मंडळांत निम्मे सभासद हिंदी असले पाहिजेत.

( ४ ) सूचित केल्याप्रमाणें कौन्सिल ऑफ् स्टेट निर्माण केल्यास त्यांतील निम्मे सभासद मतदारसंघांनीं निवडलेले असले पाहिजेत.

( ५ ) अंदाजपत्रकाला लेजिस्लेटिव्ह असेंब्लीची मान्यता पाहिजे.

( ६ ) साम्राज्यांतील इतर स्वायत्त वसाहतींना जें आर्थिक स्वातंत्र्य आहे तें हिंदुस्थानला मिळालें पाहिजे.

## प्रांतिक.

( १ ) प्रांतिक कायदेमंडळें इतकीं विस्तृत असावींत कीं, विशिष्ट लोकसंख्या असलेल्या तालुक्याचा प्रतिनिधि त्यांत निवडून आला पाहिजे. मतदारसंघ व्यापक असून त्यांत शेतकऱ्यांना मतदानाचा हक्क मिळाला पाहिजे.

( २) नव्या कौन्सिलांत जे दिवाण नेमावयाचे त्यांजवर कायदेमंडळांतील बहुसंख्य प्रतिनिधींचा विश्वास पाहिजे.

( ३ ) या दिवाणाकडे विशिष्ट खातीं सोपवून दिलीं असलीं तरी तेच त्या त्या प्रांताच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष असावेत.

( ४ ) राखीव खातीं नसावीं.

( ५ ) हिंदुस्थानांतील प्रांतांना ज्या सुधारणा लावण्यांत येतील त्याच ब्रह्मदेशाला लावण्यांत याव्यात.

वरीलप्रमाणें पंडित मालवीय व मौ. महंमद अली प्रभृति पुढाऱ्यांनीं सरकारास सुचविलेल्या मागण्या किती योग्य होत्या हें यावरून दिसून येण्यासारखें आहे. आणि सूचनेप्रमाणें सरकार वागतें तर लोक व सरकार या उभयपक्षांचा फायदा झाला असता.

मौ. महंमद अलींनीं वरील सूचनांची व स्वातंत्र्याची जाणीव होण्यासाठीं मधूनमधून देशभर दौरा काढला. थोड्याच अवधींत हिंदुस्थानांत स्वातंत्र्याचें वारें शिरून लोकांत जागृति झाली. याजबद्दल मौ. महंमद अलींच्यावर पुष्कळशीं संकटें ओढवलीं. परंतु तीं त्यांनीं आनंदानें स्वीकारलीं. खिलाफतीसंबंधानें वेळप्रसंगीं त्यांना पुष्कळसे विरोधकही भेटले. पण त्यांनाही मौ. महंमद अलींनीं दाद दिली नाहीं. जेव्हां हिंदुस्थानांत त्यांच्या मतांस विरोध होऊं लागला तेव्हां ते युरोपमध्यें निघून गेले आणि फ्रान्समध्यें व तुर्कस्थान वगैरे देशांमध्यें जाऊन खिलाफतीसंबंधानें भाषणें करून व लेख लिहून तिकडे जागृति केली. मौ. महंमद अली मोठे धोरणी व दूरदृष्टि होते. खिलाफत चळवळ ही एकप्रकारची राष्ट्रीय चळवळ आहे. सबब तिचा राष्ट्रीय पक्षाशीं मिलाफ करणें त्यांना योग्य दिसलें व त्या पक्षास सामील झाले. परंतु कॉंग्रेसमधील कांहीं राष्ट्रीय पुढाऱ्यांना खिलाफतीचा प्रश्न हा धार्मिक स्वरूपाचा आहे. त्याचा संबंध कॉंग्रेसशीं कशाला ? असें वाटूं लागलें व म्हणून ते या चळवळीपासून दूरदूरच राहूं लागले. असें होतां होतां नागपूरमध्यें जेव्हां राष्ट्रीय पक्षाच्या लोकांची सभा भरली त्या सभेंत मौ. महंमद अलींनीं हाच ठराव दुसऱ्या वेळीं पुढें मांडला. त्या वेळीं हिंदु मुसलमानांत ऐक्य असणें कसें हिताचें आहे यावद्दल त्यांनीं मोठें

खुबीदार भाषण केलें. तेव्हां जे पुढारी मुसलमानांशीं फटकून राहण्याची इच्छा करीत होते. ते मिळूनमिसळून वागण्यास कबूल झाले.

एकंदरींत देशहिताच्या दृष्टीनें हें हिंदुमुसलमानांचें ऐक्य घडवून आणण्यासाठीं मौ. महंमद अलींनीं बरेच प्रयत्न केले आणि राष्ट्रीय पक्षाशीं मुसलमानांचा मिलाफ करून हा पक्ष पूर्वीपेक्षां बराच बलवत्तर करून सोडला.

---

## प्रकरण ७ वें

# कराचीचा खटला !

हिंदु-मुसलमानांचें ऐक्य घडवून आणण्याचे कामीं देशांतील सर्वच पुढाऱ्यांचे आटोकाट प्रयत्न चालू झाले. त्यामुळें आसेतुहिमाचल जनतेमध्यें स्वातंत्र्याची चळवळ सुरू झाली. तींत मौ. महंमदअलींनीं मामुल्यानें भाग घेऊन बरीच लोकजागृति केली. पूर्वी महायुद्धांत हिंदुस्थाननें इंग्लंडला जी मदत केली, त्यामुळें ब्रिटिश साम्राज्यांत हिंदुस्थानचा दर्जा वाढून हिंदी लोकांना राजकीय बाबतींत जास्त हक्क द्यावेत असें इंग्लिश मुत्सद्यांना वाटूं लागलें. आणि त्याप्रमाणें लागलीच पार्लमेंटसभेनें पुढील धोरण जाहीर केलें:—

'राज्यकारभारांत हिंदी लोकांचें सहकार्य घेऊन हिंदुस्थानांत जबाबदार राज्यपद्धति हप्त्याहप्त्यानें सुरू करण्यांत येईल.' वरील धोरणान्वयें हिंदुस्थानचे तेव्हांचे भारतमंत्री ना. मॉटेग्यु व व्हाइसरॉय लार्ड चेम्सफर्ड यांनीं हिंदुस्थानभर दौरा काढला आणि परिस्थिति पाहून तत्संबंधीं एक रिपोर्ट पार्लमेंटकडे सादर केला. नंतर पार्लमेंटनें त्या रिपोर्टास अनुसरून इ. स. १९१९ मध्यें

' मॉंटेग्यु—चेम्सफर्ड ' नांवाचा सुधारणांचा कायदा पास केला. या कायद्यामुळें हिंदुस्थानचें राजकीय पाऊल बरेंच पुढें पडलें. लोकांना मताधिकार मोठ्या प्रमाणावर मिळाला-प्रांतिक व व्हाइसरॉय यांच्या कायदेकौन्सिलांत लोकनियुक्त सभासदांची संख्या निम्म्यापेक्षां जास्त होऊन राज्यकारभाराची खातीं लोकांनीं निवडलेल्या दिवाणांच्या ताब्यांत-देण्यांत आलीं. या सोपीव खात्यांचा कारभार कसा काय चालतो तें पाहून पुढें दहा वर्षांनीं यापेक्षां जास्त हक्क देण्यांत येतील असेंही जाहीर करण्यांत आलें. शिवाय हिंदुस्थानला साम्राज्यपरिषदांत व राष्ट्रसंघांत प्रतिनिधि पाठविण्याचा हक्कही प्राप्त झाला.

मॉंटफर्ड सुधारणा जाहीर झाल्यानंतर थोड्याच दिवसांनीं अमृतसर येथें कॉंग्रेसचें ३४ वें अधिवेशन सुरू झालें. तेथें राष्ट्रीय सभेनें ' मोर्ले मिंटो ' सुधारणांच्या मानानें ' मॉंटफर्ड ' सुधारणा पुष्कळच प्रगतिपर आहेत यांत शंका नाहीं; परंतु हिंदुस्थाननें साम्राज्यसरकारास जागतिक युद्धप्रसंगीं केलेली मदत व हिंदुस्थानांत झालेली राजकीय जागृति या मानानें सदर सुधारणा अपुऱ्या, निराशाजनक व असमाधानकारक आहेत असें जाहीर केलें. लो० टिळकांनीं प्रतियोगी सहकारितेच्या तत्त्वाची घोषणा या सभेंत केली व मिळेल तें पदरांत पाडून जास्ती मिळण्यासाठीं चळवळ करावी असें ठरविलें. अशा प्रकारें पुढाऱ्यांनीं आपापलीं मतें जाहीर केलीं या वेळीं मौ. महंमद अलींनीं प्रतियोगी सहकारितेस पाठिंबा देऊन सुधारणा राबविण्याचा ठराव सदर सभेंत पास करून घेतला. परंतु हिंदुस्थानच्या नोकरशाहीच्या हातून लोकांच्या भावना दुखविणारीं जीं कांहीं कृत्यें घडून आलीं त्यामुळें नोकरशाहीवर आपण निष्कारण विश्वास टाकला असा अनुभव लोकांस आला. त्यांतच पंजाब प्रांतांत डायर-ओडवायर यांच्या कृत्यांची भर पडली. अर्थात अत्यंत राजनिष्ठ अशा लोकांचा विश्वास नोकरशाहीवरून उडाला व तदनंतरच कलकत्ता येथें खास कॉंग्रेस अधिवेशन भर-

विण्यांत येऊन त्यांत कॉलेजें, कौन्सिलें, कोर्टें यांवर बहिष्कार घालण्याचा ठराव पास करण्यांत आला. परंतु पंडित मालवीयांनीं यास विरोध घेऊन मिळालेलें गमाविणें बरें नाहीं असें प्रतिपादन केलें. तरीसुद्धां मौ. महंमद अलीप्रभृति पुढाऱ्यांना हा पोक्त उपदेश न आवडून सर्वांनुमतें नागपूर जादा अधिवेशनमध्यें बहिष्काराचा हा ठराव पास करण्यांत आला.

नागपूरच्या राष्ट्रीय अधिवेशनापासून राजकारणास निराळेंच वळण मिळालें. यापुढें सरकारकडे अर्जविनंत्या न करतां स्वावलंबनाचा मार्ग स्वीकारण्यास सुरवात झाली. ठरावास अनुसरून राष्ट्रीय पक्षाच्या लोकांनीं कौन्सिलावर बहिष्कार घातला, विद्यार्थ्यांनीं शाळा कॉलेजें सोडलीं, शेंकडों वकीलांनीं कोर्टांवर बहिष्कार घातला, राष्ट्रीय सभेच्या आज्ञेनुसार हजारों तरुणांनीं तुरुंगवास पत्करला. इकडे सरकारची दडपशाही जोरांत सुरू झाली तेव्हां तिला तोंड देण्यासाठीं हिंदी पुढाऱ्यांचे प्रयत्न सुरू झाले. मौ. महंमद अली, बॅ. जीना, पंडित मालवीय इत्यादिकांनीं यांत पुढाकार घेतला व राष्ट्रांत सर्व पक्षांत ऐक्य व्हावें याप्रीत्यर्थ प्रयत्न सुरू केले.

यापूर्वी मौ. महंमद अलींनीं फ्रान्स, इंग्लंड वगैरे युरोपियन राष्ट्रांत जाऊन खिलाफत व स्वातंत्र्य या संबंधीं बरीच चळवळ केली होती व आतांहि वरील बहिष्काराच्या चळवळींत उत्साहानें भाग घेतला तेव्हां येथील नोकरशाहीनें आरंभिलेल्या दडपशाहीच्या धोरणानुसार मौ. महंमद अलीवर तिची वक्र दृष्टि व्हावी यांत कांहींच आश्चर्य वाटण्यासारखें नाहीं. तथापि या रोषास मौ. महंमद अलींनीं मुळींच जुमानलें नाहीं. उलट अंगीकृत कार्य तसेंच चालू ठेवून सर्व हिंदुस्थानभर स्वातंत्र्याचा डंका गाजवीत फिरले. त्या वेळीं हिंदु, मुसलमान, पारशी, शीख आणि इतर समाजांतील कांहीं पुढाऱ्यांनीं त्यांना साथ दिली. अखेर

हीं स्वातंत्र्याची लाट पसरत पसरत लष्करी छावण्यापर्यंत जाऊन भिडली. याच वेळीं कराची खिलाफत कान्फरन्स मध्यें मौ० महंमद अलींनीं ब्रिटिश सरकारच्या लष्करी व पोलीस खात्यात नोकरी धरणें इस्लाम धर्माविरुद्ध आहे, असा ठराव मजुरीस मांडला. त्यामुळें नोकरशाहीनें त्याच्यावर राजद्रोही भाषण व सैन्यात फद-फितुरी माजविली असा आरोप ठेवला. पुढे आगस्ट १९२० मध्यें सुप्रसिद्ध मोपला बंड उद्भवलें.तें शमविण्यासाठीं अली बंधु जात असताना त्याच्यावर १०७कलम लागू करण्यात आलें.व या दोन कारणावरून ता० ४ आक्टोबर १९२१ रोजीं विजगापट्टण येथें उभयता बंधूना पकडण्यात आलें. आणि त्याच्यावर खटले भरून त्याची चौकशी कराचीस सुरू झाली. अली बंधूना अटक झाल्याची बातमी कराचीभर पसरली. राष्ट्रीय पक्षाच्या लोकाना मोठा विचार पडला काय करावें, कसें सोडवावें याजबद्दल त्याच्यात बोलणीं सुरू झालीं परंतु मौ० महंमद अलींना झालेल्या अटकेबद्दल कांहींच वाटलें नाहीं.

पुढें हा खटला ता. १६ आक्टोबर १९२१ रोजीं कराचीस सुरू झाला मौ० महमद अलींनीं बचावासाठीं आपल्यातर्फे वकील किंवा बॅरिस्टर मुळींच दिला नाहीं ते स्वत च खटल्याचें काम चालवू लागले. खटला ऐकण्यासाठीं न्यायकोर्टापुढें हजारों लोकाचे थवे जमत असत त्या सर्वांचा बंदोबस्त राखता राखता पोलिसास पुरें पुरें होऊन गेलें. मौ० महमद अली कोर्टापुढें आपली कैफियत मांडताना म्हणाले, ' महाराणी व्हिक्टोरिया साहेबांनीं जाहीरनाम्यात प्रसिद्ध केल्याप्रमाणें प्रत्येकास आपापल्या धर्माप्रमाणें वागण्याचा हक्क आहे म्हणजे प्रत्येक धर्माचा मनुष्य धार्मिक कार्य करताना तो स्वतंत्र आहे. त्याला कोणत्याच कायद्याचें बंधन घालना येत नाहीं असें असता

मुसलमान समाजाची धार्मिक व स्वतंत्र अशी खिलाफतीची चळवळ बेकायदेशीर मुळींच ठरत नाहीं अर्थात् त्या सवधानें मजवर जो आरोप आहे तो ब्रिटिश सरकारच्या कायद्यानेंच आपोआपच नाहींसा होतो. त्याना या मोठ्या न्यायाधिशाच्या न्यायाची जरूरी नाहीं, मौ. महमदअलींचें हें बोलणें न्यायाधिशाला बरोबर पटलें व त्यांनी त्याच्यावरील आरोप काढून टाकिले. तरीपण या वेळीं इतर राजकीय अपराधाचें माप त्याचे पदरीं घालून शेवटीं २ वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा भोगण्याची पाळी अलीबधूवर आली. न्यायाधिशानीं निकाल सागितल्यावर मौ. महंमद अलींच्या चेहऱ्यावर हास्यलहरी दिसूं लागल्या. सरकारनें आपल्या देशभक्तीचा गौरव करून आपल्याला योग्य तें बक्षीस दिलें. अशाप्रकारचे समाधान व्यक्त करून मौ. महंमद अली आपल्या बधूसह शिक्षा भोगण्यासाठीं कारागृहात निघून गेले. परतु या प्रसगीं अलीबधूच्या प्रेमाचें व देशसेवेचें गभीर चित्र डोळ्यापुढें उभें राहून जनसमुदाय क्षणमात्र विस्मय पावला! स्वत च्या धैर्यानें आलेल्या सकटास तोंड देऊन देशासाठीं आपलें सारसर्वस्व समर्पण करणाऱ्या मौ. महमद अलींना 'आदर्श व्यक्ति' असें का म्हणूं नये?

---

प्रकरण ८ वें.

## कोकोनाडा कॉंग्रेस.

राजविलासात काल घालविणाऱ्या आणि बादशाही वैभवात लोळणाऱ्या मो. महमद अलींना तुरुगवासातील खडतर आयुष्य घालविण्याचे नशिबीं यावें यापेक्षा दुर्दैव तें कोणतें? परंतु दुर्दैव कसलें? पार्लमेंटचें मुख्य प्रधान रॅम्से मॅक्डोनल्ड याना म्हटलें आहे

कीं, देशाच्या उर्जितावस्थेच्या कालात अशा प्रकारच्या गोष्टी घडणें साहजिकच आहे. तुरुंगवास पत्करण्यात मौ. महंमद अलींचें उच्च ध्येय होते. आपल्या हिंदी जनतेस कांहीं हक्क मिळावेत व त्यांची गुलामगिरींतून सुटका व्हावी, त्यासाठीं ते आपल्या सरकारजवळ हक्क मागत होते. परंतु हिंदुस्थानात निरनिराळ्या जातिधर्मांचे लोक राहातात. त्या सगळ्यामध्यें ऐक्य नाहीं. कोणास काय द्यावे असा साम्राज्य सरकारास विचार पडला व पुढें काय करावें याबद्दल येथें व लंडनमध्यें मोठमोठ्या लोकांत वादविवाद सुरू झाले. या वाटा-घाटींत बरेच दिवस गेले. त्याचा कांहींच निकाल लागला नाहीं. इतक्यात मौ. महंमद अलींच्या शिक्षेची मुदतही संपली. पुढें त्यांना सोडून देण्यात आलें.

प्रत्यक्ष कार्याला एकरूप होण्याचा मौ. महंमद अलींचा स्वभाव-धर्म असल्यामुळ स्वतःच्या देहाची किंवा कुटुंबाची ते बिलकूल पर्वा करणारे नव्हते. त्याचा उत्साहही यत्किंचित् कमी झालेला नव्हता. तुरुंगातून सुटून आल्यानंतर मौ. महंमद अलींनीं अंगीकृत कार्य सुरू करण्याचें ठरविलें. परंतु त्या वेळीं स्वदेशावर प्रेम ठेवणारे व स्वातंत्र्याची चळवळ करणारे लोक फारच थोडे होते. मुख्य मुख्य पुढारी एकामागून एक तुरुंगात खेंचले गेले. या संधीचा फायदा आपमतलबी लोकांनीं करून घेतला. अशातच शुद्धि-संघटनाची चळवळ उदयास येऊन हिंदु–मुसलमानात बेबनाव उत्पन्न होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. आणि हिंदुमुसलमानांच्या ऐक्याची इमारत ढासळूं लागली. ही गोष्ट कांहीं जाणत्या व धोरणी पुढाऱ्यांनीं चटकन जाणली. ही ऐक्याची जूट जर फुटली तर तंटे माजून अनेक भानगडी उत्पन्न होतील आणि अशाप्रकारें स्वराज्य मिळण्याच्या मार्गांत अडथळे माजतील. म्हणून सर्वांनीं एक विचारानें कोकोनाडा कॉंग्रेसच्या अध्यक्षांच्या

स्थानीं मौ. महंमद अलींची योजना केली. तत्पूर्वी मौ. महंमद अलींच्या मध्यस्थीमुळें कौन्सिलप्रवेश शक्य झाल्यामुळें प्रतिसहकार्यपक्षीय पत्रांकडून त्यांचा गौरव होऊं लागला व याच वेळीं ते कोकोनाडा कॉंग्रेसचे अध्यक्ष होणार असल्यानें त्यांच्या मताला स्वाभाविकपणेंच महत्त्व होतें. कॉंग्रेसच्या पूर्वी महंमद अली पुण्यास आले असतां त्यांना मानपत्रही देण्यांत आलें. जरी या वेळीं हिंदुस्थानची जातिविषयक स्थिति फार नाजूक होती तरी मौ. महंमद अलींनीं आपलें अध्यक्षीय जें भाषण केलें तें खरोखर इतकें उद्बोधक आणि परिणामकारक झालें कीं, हिंदु–मुसलमानांच्या ऐक्याची विस्कळित झालेली घडी पुनः पूर्ववत् बसण्याची आशा पुढाऱ्यांना वाटूं लागली. याच कॉंग्रेसमध्यें त्यांनीं हिंदुमुसलमानांच्या ऐक्याबाबत एक पोटकमिटी स्थापन केली. आणि त्यामध्यें मोठ्या कसोशीनें काम करून घेतलें. यासमयीं त्यांनीं आपल्या भाषणांत हिंदु–मुसलमानांच्या ऐक्यासंबंधानें आपलें जें मत प्रतिपादन केलें तें खरोखरच विचार करण्यासारखें आहे, तें असें:–' हिंदू केव्हांहि मुसलमानांना व मुसलमान केव्हांही हिंदूंना नष्ट करूं शकणार नाहींत. आम्ही उभयतां मिळून मात्र परकीयांशीं सामना करण्यास समर्थ आहों. परंतु हिंदूंनीं सुद्धां मुसलमानांना परकीयांसारखें न लेखतां आपुलकीच्या भावनेनें वागवूं असें जाहीर करावें. त्यायोगें आमचें इच्छित ध्येय गांठण्यास मुळींच अडचण भासणार नाहीं. बंधुहो, या संबंधानें माझी परमेश्वराजवळ अशीच प्रार्थना आहे कीं, ह्या ऐक्यरूपी रवीचा प्रकाश भरतखंडावर पडून हिंदुमुसलमानांचें स्वराज्य होवो. याशिवाय त्यांच्या अध्यक्षीय भाषणांत खिलाफतीसंबंधीं विस्तृत विचार, असहकारिता, हिंदु मुस्लीमवाद, विधायक कार्यक्रम, कौन्सिलप्रवेश वगैरे प्रश्नांची चर्चा होती.

—

प्रकरण ९ वें.

## राष्ट्रीय पक्षांत फाटाफूट.

कोकोनाडा कॉंग्रेस अधिवेशनांत हिंदुमुसलमानांत ऐक्य या विषयावर भर दिला गेल्यानें, सर्वांनाच या ऐक्याबद्दल आशा वाटूं लागली. तथापि त्यांच्यांत किरकोळ झगडे सुरू राहिलेच !

पुढें यासंबंधानें पुनः १९२४ मध्यें दिल्ली येथें हिंदुमुसलमानांचे झगडे मिटविण्यासाठीं 'ऑल पार्टीज्' कान्फरन्स भरली गेली. उद्देश हा कीं, यावेळीं तरी हिंदुमुसलमानांतील क्षुल्लक झगडे नष्ट होतील व एक विचारानें स्वराज्याचे हक्क सरकाराकडे मागतां येतील. या कान्फरन्समध्यें मौ० महंमद अलींनीं इतकी मेहनत घेतली कीं त्याची हद्द नाहीं. परंतु त्याच्या परिश्रमाचें कांहींच चीज झालें नाहीं !

हिंदुमहासभा व मौ० महंमदअली यांच्यांत मतभेद उत्पन्न झाला. यामुळें त्यांना फार वाईट वाटलें व त्याचा परिणाम त्यांच्या प्रकृतीवर होऊन अखेर ते आजारी पडले. यावेळीं मौ० महंमद अलींनीं पुनः 'कामरेड' व 'हमदर्द' हीं पत्रें सुरू केलीं व त्यांत चालू परिस्थितीवर लेख लिहूं लागले. सबब सरकारनें दोन्हीं पत्रें बंद केलीं. दिवसेंदिवस मौ० महंमद अलींचा आजार वाढतच गेला. नंतर महाराजा अल्वर यांनीं औषधोपचारासाठीं त्यांना यूरोपमध्यें पाठविलें. तेथें उत्तम डॉक्टरांच्या औषधानें त्यांना थोडें बरें वाटलें, परंतु स्वदेशसेवा व सुधारणा ही त्यांना स्वस्थ बसूं देईनात. अर्थात् या कामामुळें ते वरचेवर आजारी पडत.

पुढें ते हिंदुस्थानांत परत आले तेव्हां दिल्लीमध्यें बॅ. जीना यांनीं एक योजना तयार करून ती मौ० महंमद अलींना दाखविली. तींत मुसलमानांच्या जातिविशिष्ट मागण्या होत्या.

## मुसलमानांच्या जातिविशिष्ट मागण्या—

१ हिंदुस्थानमध्यें यापुढें राजघटना ही फेडरल असावी, युनिटरी असूं नये ( म्हणजे सत्तेच्या दृष्टीनें मध्यवर्ती हिंदुस्थान-सरकार हें सर्व श्रेष्ठ असें मानलें न जातां स्वायत्त अशा निरनिराळ्या प्रांताच्या एका संघाच्या हातीं ही मुख्य सत्ता असावी ).

२ प्रत्येक प्रांत आपापल्याला कारभारामध्यें सर्वसत्ताधीश असावा.

३ कांहीं विशिष्ट मोजक्या नेमक्या शब्दांनीं उल्लेखिलेल्या अशा विषयासंबंधाची सत्ता मध्यवर्ती सरकारच्या हातीं रहावी.

४ अशा रितीनें वाटून दिल्यावर ते शेषाधिकार म्हणजे जे अधिकार घटनेंत अनुल्लेखित राहतील किंवा ज्यांच्या वाटणीसंबंधानें संशय उत्पन्न होईल असे अधिकार प्रांतिक सरकारचे हातीं राहावेत.

५ वरिष्ठ किंवा प्रांतिक कायदेमंडळांत हिंदु व मुसलमान या दोन्ही समाजांचा संबंध येईल. तेथें कोणत्याहि समाजाच्या प्रतिनिधींपैकीं $\frac{3}{4}$ प्रतिनिधि हरकत घेतील त्या विषयाची चर्चा होऊं नये.

६ जातवार वेगळे मुसलमान मतदारसंघ आज इतकीं वर्षें अमलांत राहिल्यानें तो कायदाच बनून गेला आहे. तेव्हां तीं स्थिति बदलण्याचा कोणासही अधिकार असूं नये.

७ निरनिराळ्या कायदेमंडळांतून मुसलमानांच्या प्रतिनिधींची संख्या आहे तशीच अबाधित रहावी.

८ वरिष्ठ कायदेमंडळामध्यें मुसलमान प्रतिनिधींची संख्या कमींत कमी $\frac{1}{3}$ असली पाहिजे.

९ सिंध प्रांत स्वतंत्र बनविण्यांत यावा. मात्र तेथें हिंदु हे

सख्येनें थोडे म्हणून उत्तर प्रांतात अल्पसंख्याक मुसलमानांना ज्या सवलती मिळतील त्या हिंदूंना देण्यात याव्या.

१० बलुचिस्तान व वायव्य सरहद्दीचा प्रांत हेहि स्वतंत्र बनविण्यात यावेत व तेथेंहि वरीलप्रमाणें हिंदूंना सवलती देण्यात याव्या.

११ प्रत्येक प्रांतात सरकारी नोकरी वगैरे बाबतींत मुसलमानांना लोकसंख्येप्रमाणे योग्य असेल तो हिस्सा द्यावा.

१२ अशा रितीनें स्वराज्याची घटना ठरल्यावर त्या घटनेंत समाविष्ट असलेल्या सर्व घटकांच्या संमतीशिवाय तिच्यांत कोणतेही फेरफार करण्यात येऊं नयेत.

१३ मुसलमान समाजानें ही मागणी निश्चित केली असल्यामुळें दुसऱ्या कोणीही कोणतीही घटना किंवा योजना निराळी सुचविली व तींत वरील तत्त्व ग्रथित केलें गेलें नाहीं तर ती घटना किंवा योजना मुसलमान समाजाला केव्हांही मान्य होणार नाहीं.

या मागण्यावरून मुसलमानांना खरा सवता सुभा पाहिजे होता, असें स्पष्ट दिसून येतें.

याच्या उलट हिंदुसभेनें आपली राष्ट्रीय स्वरूपाची मागणी पुढीलप्रमाणें व्यक्त केली ती अशी—

## हिंदु महासभेची मागणी—

१ एकाच राष्ट्राचे नागरिक व घटकावयव म्हणून सर्व जातींच्या मतदाराचा एक सामान्य मतदारसंघ असावा.

२ जातिप्रधान व विभक्त असे मतदारसंघ स्थापण्यांत येऊं नयेत.

३ कोणत्याही विधिमंडळात एकाद्या जातिसाठीं जागा राखून ठेवण्यांत येऊं नयेत.

४ कोणत्याहि जातीला संख्याप्राधान्य देण्यात येऊ नये.

५ प्रांतातील मतदानपद्धति सर्वजातींसाठीं एकसारखी असावी.

६ वरिष्ठ विधिमंडळासाठीं किंवा संयुक्त राज्यपद्धतिसाठीं सर्व जातींकरितां एकमुखी मतदानपद्धति असावी.

७ राष्ट्रसंघानें ठरविल्याप्रमाणें भाषा, धर्म आणि वर्णाचार एतत्संबंधीं राज्यघटनेंतच अल्पसंख्याकांना रक्षण देण्यांत यावें.

८ बहुसंख्याकांना कोणत्याही सबबीवर( राखीव जागा ) वगैरे- संबंधीं ) संरक्षण देण्यांत येऊं नये.

९ भाषा,राज्यघटना आर्थिक प्रश्न वगैरे बाबींचा बारकाईनें विचार केल्याशिवाय सध्यां असलेल्या प्रांतमर्यादा बदलण्यांत येऊं नयेत.

१० अवघ्या हिंदुस्थानचें एकराष्ट्रीयत्व व हित साधण्यासाठीं अवशिष्ट अधिकार मध्यवर्ती विधिमंडळालाच देण्यांत यावेत.

११ सरकारी नोकऱ्या, मानसन्मान वगैरेंसारखे सामाजिक व राजकीय हक्क उपभोगण्यास कोणत्याहि हिंदी नागरिकाला प्रतिबंध करण्यांत येऊं नये.

हिंदुसभेच्या मांडणीच्या भावना जातवार पक्षाविरहित असल्यानें मुसलमान पुढाऱ्यांच्या मागणीशीं मतभेदाचें आविष्करण स्पष्ट झालें आणि कॉंग्रेसहि हिंदुमहासभेचाच अनुवाद करते, म्हणून मुसलमान व कॉंग्रेस यांमध्यें मतभेदाचीं चिन्हें दृग्गोचर होऊं लागलीं. पुढें मद्रास कॉंग्रेस अधिवेशनमध्यें देवी सरोजिनी नायडू यांनीं हिंदुमुसलमानांच्या ऐक्याचा ठराव मांडला. त्यावर पं.मालवीयांचें भाषण फारच उत्तम झालें. तेव्हां महंमद अलींनीं त्यांचा गौरव केला व ते म्हणाले, "मालवीय हे अल्पसंख्याकांचे संरक्षणकर्ते आहेत व मी त्यांजवर विश्वास ठेवतों. आम्ही परस्परांचा विश्वासघात केव्हांच करणार नाहीं परंतु त्या वेळीं कॉंग्रेसपक्षामध्यें त्या संबंधानें एकमत झालें नाहीं.

यानंतर इ. स. १९२७ मध्यें नवें सुधारणाकमिशन ( सायमन कमिशन ) नेमण्यांत येणार असल्याचें ना. व्हाइसरॉय यांनीं

जाहीर केलें. या सुधारणाकमिशनवर देशातील सर्व पक्षांनीं बहिष्कार घातला परंतु कमिशनला उत्तर म्हणून हिंदुस्थानला राज्यघटना कशी असावी यासाठीं ता. १९ मे १९२८ रोजीं सर्व पक्षांची परिषद बोलाविली. तींत पंडित मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं घटना-कमिटी नेमण्यांत आली. कमिटीनें रिपोर्ट तयार करून तो कलकत्ता येथें कॉंग्रेस-अधिवेशनांत मांडला. त्याला सर्वांचा पाठिंबा मिळाला. परंतु या वेळीं मौ. महंमद अलींनीं नेहरू रिपोर्टांत मुसलमानांच्या हक्कांचा कांहींच विचार केला नाहीं म्हणून त्यांचा राष्ट्रीय पक्षाशीं विरोध येऊन ते निराळ्याच उद्योगास लागले.

---

## प्रकरण १० वें

# सरकारशीं सहकार्य

राष्ट्रीय पक्षाशीं मौ. महंमद अलींचा विरोध उत्पन्न होण्यास मुसलमानांचा सवता सुभा असावा हें कारण जरी मूलभूत असलें तरी नेहरू रिपोर्टामुळें त्यांत अधिकच भर पडून मौ. महंमद अलींनीं राष्ट्रीय पक्षाशीं असलेला संबंध सोडिला हेंही खरें आहे. तेव्हां नेहरू रिपोर्टामध्यें कोणकोणत्या गोष्टी समाविष्ट केल्या गेल्या होत्या, हें समजावून घेणें अगत्याचें आहे—

१ स्वातंत्र्य पाहिजे आहे खरें. पण सर्वांनाच आज कबूल नाहीं. सर्वमान्य असें जबाबदारीचें स्वराज्य दिल्यास पुढें स्वराज्याची घटना ठरवितां येईल.

२ साम्राज्यांतील वसाहतींमध्यें स्वराज्याचा दर्जा प्राप्त झालेला आहे. त्याप्रमाणेंच हिंदुस्थानला जबाबदारीचें स्वराज्य देण्यांत यावें.

३ कायदेकौन्सिल हा मालक आणि प्रधानमंडळ हा हाताखालचा नोकर असा संबंध असलेली सत्ता प्रस्थापित व्हावी.

४ आजची राज्यपद्धति मोडून अस्सल जबाबदारीचें राज्य स्थापावें अशी हिंदी लोकांची इच्छा आहे.

या रिपोर्टामुळें मुसलमानांच्या दृष्टीनें कांहींच फायदा असल्याचें दिसेना. मौ. महंमद अलीही मोठे करारी होते. मुसलमान समाजाच्या हिताच्या मागण्या जरी राष्ट्रीय पक्षानें मान्य केल्या नाहींत. तरी त्या सरकाराकडून मान्य करून घेईनच घेईन, असा त्यांना आत्म-विश्वास होता. व त्यासाठीं त्यांनीं मोठमोठ्या अधिकाऱ्यांच्या गांठी घेऊन आपला हेतु त्यांना समजावून दिला. अशाप्रकारें सरकार पक्षाशीं समेट घडवून आणण्याकडे मौ. महंमद अलींचें लक्ष वेधलें. यामुळें कांहीं विवक्षित लोकांचा त्यांच्या संबंधानें गैरसमज उत्पन्न झाला. इतकें झालें तरी मौ. महंमद अलींनीं आपलें मन शांत ठेविलें. व आपलें इच्छित कार्य कसें साधतां येईल याचा ते विचार करूं लागले.

मौ. महंमदअलींचे विचार सरकारपक्षास पटल्यामुळें सरकारनेंही त्यांच्या वरील आपला रोष सोडून दिला. पुढें फिरून एक वेळ मुसलमानांच्या मागण्या कॉंग्रेसपुढें मांडून हिंदु-मुसलमानांच्या ऐक्याबाबत प्रयत्न करावा असें मौ. महंमद अलींना वाटलें व त्या हेतूनें लाहोर येथें कॉंग्रेस अधिवेशनास ते हजर राहिले. त्या वेळीं महात्मा गांधीजींची भेट घेऊन मौ० महंमद अलींनीं या अधिवेशनांत तरी मुसलमानांच्या मागण्यांचा विचार करावा असें सांगितलें.आणि आमच्या मागण्यांचा सहानुभूतिपूर्वक विचार झाल्यास उभयपक्षांत ऐक्य होऊन सरकाराकडे स्वराज्याची एकमुखी मागणी करतां येईल, अशीही सल्ला महात्माजींना त्यांनीं दिली. परंतु ह्या कॉंग्रेसमध्यें मौ० महंमद अलींच्या म्हणण्याचा तितकासा विचार केला गेला नाहीं. याच अधिवेशनांत नेहरु रिपोर्टावरही त्यांनीं बरेच आक्षेप घेतले. कारण-यामध्यें भांडवलवाले व जमीनदार यांनाच फायदेशीर अशा गोष्टी

आहेत, शिवाय जातीय प्रश्नाचा विचार त्यांत मुळींच केला नसल्यानें नेहरु-रिपोर्टाची इतिश्री येथेंच झाली.

पुढें सर ए. पी. पेट्रो यांनीं सर्व पक्षांची सभा मुंबईस भरविली. हेतु हा कीं जातीय व राजकीय वाद मिटावेत; परंतु त्या वेळची परिस्थिति प्रतिकूल असल्यानें राष्ट्रीय पक्षानें त्यांत भाग घेतला नाहीं. मौ० महंमद अलींनीं जातीय मागण्या राष्ट्रीय पुढाऱ्यापुढें वेळोवेळीं मांडल्या असतांना सुद्धां त्याचा विचार झाला नाहीं. अर्थात् त्यांनीं वरील सभेच्या संधीचा फायदा घेऊन ते त्या सभेस हजर राहिले. व त्यांनीं तेथें मुसलमानांच्या मागण्या मोठ्या कुशलतेनें मांडल्या.

मुंबईच्या सभेनंतर मौ० महंमद अलींच्या पक्षानें आपल्या जातीय मागण्या पूर्ण करण्याची वाट धरिली तर कॉंग्रेस पुढाऱ्यांनीं महात्मा गांधींच्या धोरणान्वयें कायदेभंग करण्याचें ठरवून सर्व देशभर चळवळ सुरू केली. पुढें या चळवळीस इतकें प्रचंड स्वरूप प्राप्त झालें कीं, अखिल हिंदुस्थानांत सविनय कायदेभंग होऊं लागला. पंडित मालवीय, देवी सरोजिनी नायडु, आबास तय्यबजी प्रभृति हजारों पुढारी यापायीं तुरुंगांत गेले. या वेळीं हिंदु, मुसलमान, पारशी, खिस्ती, शीख या सर्वांनीं चळवळींत भाग घेतला.

हल्लीं जर कोणाची पिळवणूक होत असेल तर ती शेतकरी, कामकरी यांची होय! या दरिद्री नारायणाची सेवा करून त्यांची स्थिति सुधारणें असेल तर प्रथमतः या [illegible]पद्धतींत आमूलाग्र सुधारणा होणें जरूर आहे याच उच्च हेतूनें सविनय कायदेभंग या चळवळीचा उगम झाला होता व हिचे [illegible] महात्मा गांधी, आणि पंडित जवाहिरलाल नेहरू हे होते. पुढें महात्मा गांधींनीं कायदेभंगाचें धुरीणत्व स्वतःचे हातीं घेऊन त्यांनी गुजराथेतील

महात्मा गांधी



शांतता व अनत्याचारी चळवळींचे प्रवर्तक. [ पृष्ठ ४

दांडी येथें प्रथम सत्याग्रह सुरू करून कायदेभंग केला. याचा जोर वाढतां वाढतां सर्वच ठिकाणीं मिठाचा कायदेभंग सुरू झाला.

या चळवळीमुळें देशांतील पुढाऱ्यांत बराच मतभेद झाला. सरकारी अधिकाऱ्यांनाहीं कांहीं सुचेना. एकीकडची चळवळ थांबवावी तर दुसरीकडे तिला अधिक जोर चढे. अखेरीं लोकांना दहशत बसण्यासाठीं सरकारनें कांहीं राष्ट्रीय पुढारी तुरुंगांत घातले. कांहीं लोकांनीं शांततेचा भंग केला, तशांना योग्य शासन दिलें. मात्र मौ० महंमद अलींच्या पक्षानें या चळवळींत भाग घेतला नाहीं व या चळवळीला त्यांनीं विरोधही केला नाहीं. ते चळवळीचें मोठ्या मार्मिकपणें निरीक्षण करीत होते. देशभर प्रसृत झालेली ही चळवळ थांबविण्याची कांहीं तरी खटपट करीन व त्यांत सुमेळ घडवून आणावा या हेतूनें शांततावादी पुढारी विचार करूं लागले. शेवटीं बॅ. सप्रू व जयकर यांच्या मध्यस्थीनें व्हाइसरॉय लार्ड आर्विन व महात्मा गांधी यांच्यांत समेट घडवून आणण्याचा आटोकाट प्रयत्न झाला. पुढें हिंदुस्थानास स्वराज्याचे हक्क देण्यासंबंधानें ब्रिटिश सरकारनें लंडन येथें राउंड टेबल कॉन्फरन्सची योजना तयार केली. व त्या कान्फरन्ससाठीं हिंदुस्थानांतील सर्व जातींच्या प्रमुख पुढाऱ्यांना हजर राहण्यासाठीं निमंत्रण देण्याचें ठरविलें.

---

## प्रकरण ११ वें

### राउंड टेबल कान्फरन्स.

जरी ब्रिटिश सरकारनें राउंड टेबल कान्फरन्सची योजना ठरविली, तरी सविनय कायदेभंगाची चळवळ देशांत सर्वत्र सुरूच होती. ती बंद करून राजबंद्यांची मुक्तता झाल्याशिवाय राउंड टेबल कान्फरन्सच्या कार्याला मूर्त स्वरूप येणार नाहीं, असें महात्मा गांधीजींनीं व्हाइसरॉयच्या बरोबर झालेल्या वाटाघाटींत ठरविलें.

त्याप्रमाणें ठरलेल्या अटींत कायदेभंगाची चळवळ बंद केली व सरकारनेंही अनत्याचारी राजबंदी सोडून दिले. आणि स्वराज्यघटनेच्या योजनेसंबंधीं पुढील धोरण जाहीर करणेंत आलें:—

ब्रिटिश सरकारच्या अनुमतीनें राउंड टेबल कान्फरन्समध्यें स्वराज्याच्या घटनेसंबंधीं ज्या योजना तयार करण्यांत आल्या त्यांपैकीं, संघिक राज्यपद्धति हें तत्त्व मुख्य समजलें जावें. राज्यकारभार हिंदी लोकांच्या कौन्सिलला जबाबदार असा राहावा. हिंदुस्थानच्या हिताकरतां जीं बंधनें व राखीव गोष्टी म्हणून ठरविलेल्या आहेत, त्याही कायम ठेवाव्या. जसें—

( १ ) देशाचें संरक्षण
( २ ) परराष्ट्रीय संबंध.
( ३ ) अल्पसंख्याकांचे हक्क.
( ४ ) हिंदुस्थानची आर्थिक पत.
( ५ ) कर्जाचा बोजा.

परंतु सर्वच पुढाऱ्यांना ही योजना मान्य झाली नाहीं. पं० जवाहिरलाल नेहरूंनीं तर सैन्य व खजिना यांवर ताबा दिल्याशिवाय वरील प्रकारची राजकीय घटना म्हणजे निव्वळ थट्टाच होय असें आपलें मत प्रतिपादन केलें.

अखेर कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें महात्मा गांधींस समेटाच्या वाटाघाटीचें मुखत्यारपत्र दिलें असल्यानें कोणाचाही विरोध चालला नाहीं. सरकार व कॉंग्रेस या दोघांमध्यें ही तात्पुरती तडजोड झाली.

या तडजोडीनंतर राउंड टेबल कान्फरन्समाटीं हिंदुस्थानांतील प्रमुख पुढाऱ्यांना निमंत्रणें पाठविलीं. त्यांमध्यें मौ० महंमद अल्लीनांही मुसलमानांचे पुढारी या दृष्टीनें आमंत्रण आलें. त्या वेळीं मौ० महंमद अल्ली आपल्या प्रकृतीच्या उपचारार्थ सिमला येथें राहिले होते. आमंत्रण देतांच मुसलमानांचे हक्क आणि हिंदुस्थानचें स्वातंत्र्य

यासंबंधीं खरी परिस्थिति काय आहे, हें पार्लमेंटला कळावें आणि प्रत्यक्ष बादशहासमोर या गोष्टी त्यांना उघड करून सांगाव्यात म्हणून ते ' राउंड टेबल कान्फरन्स ' ला जाण्याच्या तयारीला लागले.

सदर कान्फरन्सला जातांना त्यांनीं आपले वडील बंधु, मौ. शौकत अली, स्वतःची पत्नी व मुलगा यांनाहि बरोबर घेतलें व सर्व तयारी करून ते व्हाइसरॉय ऑफ इंडिया बोटीजवळ येऊन दाखल झाले. या वेळीं मौ. महंमद अलींची प्रकृति इतकी नादुरुस्त होती कीं, त्यांना मोठ्यानें बोलतां व हालचालही करतां येत नव्हती. म्हणून त्यांना कॉटवरून सदर आगबोटीवर नेण्यांत आलें. मौ. महंमद अलींना मुंबई बंदरावर निरोप देण्यासाठीं हिंदु-मुसलमानांचा प्रचंड समुदाय हजर होता. ज्या वेळीं मौ. महंमद अली आगबोटीवर दाखल झाले, त्या वेळीं त्यांच्या प्रकृतीचें दृश्य व स्वदेशभक्ति पाहून लोकांचीं अंतःकरणें भरून आलीं.

मौ. महंमद अलींनीं प्रवासामध्यें आजपर्यंत आपल्या पत्नीस केव्हांच बरोबर घेतलें नव्हतें, परंतु त्यांनीं या वेळीं या दूरच्या प्रवासांत आपल्या पत्नीस बरोबर घेतल्याचें पाहून त्यासंबंधीं जर कोणी विचारणा केली, तर ते म्हणत कीं, ही माझी पत्नी एक शुश्रूषा तरी करील अथवा दफन तरी करील !

यावर मौ. अबदुल माजीद साहेब बदायुनी व मौ. महंमद अली यांच्यांत जें संभाषण झालें तें असेः—

मौ. अबदुल माजीदः—आपण अशा अत्यंतिक आजारांत इतका दूरचा प्रवास कां पत्करित आहांत ?

मौ. महंमद अलीः—( हंसून ) मरण्यासाठीं !

मौ. अबदुल माजीदः—जर असें आहे तर पवित्र मदीना शहरीं तरी मरावयाचें होतें ?

मौ. महंमद अलीः—माझे पैगंबर महंमद (स्व.) साहेब यांच्या अनुयायांच्या हक्कासाठीं आणि देशाला गुलामगिरींतून सोडविण्यासाठीं लढाई करीत असतांना मला जर मरण प्राप्त झालें, तर खरोखर माझे पैगंबर (स्व.) मदीनेचे बादशाहा मला आपल्या कृपाछत्राखालून कधींही दूर लोटणार नाहींत आणि माझें हें मरण मदीनेंत आल्यासारखेंच होईल !

खरोखर मौ. महंमद अलींच्या प्रकृतीची परिस्थिति या वेळीं इतकी असाध्य होती कीं, त्यांना रक्ताच्या वांत्या होत होत्या. हें दृश्य पाहून त्यांचा हा प्रवास म्हणजे मृत्यूच्या जवळ जाणेंच होय ! असें कोणासही वाटल्याशिवाय राहिलें नसतें. प्रकृतीच्या अस्वस्थ स्थितींत मौ. महंमद अलींनीं जमलेल्या सर्व जनसमूहास प्रेमानें निरोप देऊन हिंदभूमीचें अखेरचें दर्शन घेतलें; व मोठ्या कष्टानें हा प्रवास पूर्ण करून ते लंडन शहरीं जाऊन पोहोंचले.

राऊंड टेबल कान्फरन्सला जाण्याचे पूर्वी त्यांनीं ता. १ आक्टोबर १९३० इ. रोजीं असें जाहीर केलें होतें कीं, 'मी हिंदुस्थानावर अत्यंत प्रेम करतों आणि तो स्वातंत्र्यांत असावा हें मी पाहूं इच्छितों. मी त्याच्या स्वातंत्र्याप्रीत्यर्थ सदोदित कार्य करीत राहिलों आहे. इतकेंच काय पण त्याच्यासाठीं प्राणार्पण करण्यास तयार आहे.'

हेच विचार लंडन येथें गेल्यावरही त्यांच्या मनांत घोळत होते. लंडन शहरीं असतांना महंमद अली फारसे हिंडत फिरत नव्हते. या वेळीं त्यांच्या पत्नीनीं त्यांची शुश्रूषा इतकी उत्तम ठेवली कीं, हिंदी स्त्रिया आपला पतिव्रताधर्म किती इमानदारीनें पाळतात याचा धडा पाश्चात्त्य स्त्रियांना त्यांनीं घालून दिला.

मौ. महंमद अलींची प्रकृति जरी इतकी अस्वस्थ होती तरी ते अहोरात्र काम करीतच होते. वर्तमानपत्रांचे प्रतिनिधि, कान्फरन्सचे सभासद, हिंदी व ब्रिटिश पुढारी, वगैरे त्यांना भेटण्यास

येत असत; तेव्हां त्यांच्यांशींही ते विचारविनिमय करीत असत. कारण त्या वेळीं मुसलमानांत इतका विचारविनिमय करणारा तेथें दुसरा कोणी पुढारी नव्हता, कीं तो आपली बाजू व्यवस्थित रीतीनें मांडूं शकेल ! भारतमंत्री बेन व मुख्य प्रधान रॅम्से मॅक्डोनल्ड यांनीं जेव्हां त्याची भेट घेतली तेव्हां मौ. महंमद अली त्याना म्हणाले, ' जातिभेद आणि फेडरेशन या बाबी हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासंबंधीं विचारांत न घेता तुम्हीं आम्हाला पूर्ण स्वराज्य द्या. त्याशिवाय आमचें समाधान होणार नाहीं. '

पुढें राउंड टेबल कान्फरन्सला सुरवात झाली. पुष्कळशा पुढाऱ्याच्या भाषणानंतर मौ. महंमद अलींना बोलण्याची संधि देण्यांत आली. त्या वेळीं त्यांनीं जें स्पष्ट व दणदणीत भाषण करून आपलें नांव मागें कायम राखिलें, त्या भाषणाचा त्रोटक गोषवारा आम्ही ' भूमिकेंत ' दिलाच आहे. '

यावरून मौ. महंमद अलींचें राउंड टेबल कान्फरन्समधील कार्य किती उच्च दर्जाचें होतें, हे वाचकांच्या लक्षात आल्यावाचून राहणार नाहीं.

---

## प्रकरण १२ वें.

## वज्राघात !

" मी हिंदुस्थानावर अत्यंत प्रेम करितों. तसेंच हिंदु-मुसलमानांमधील ऐक्य सदैव नांदून हा देश स्वातंत्र्यात असावा हें पाहूं इच्छितों. मीं जरी सध्या आजारी असलों तरी माझ्या या ध्येयाप्रीत्यर्थ राऊंड टेबल कान्फरन्समध्यें झगडण्याचा माझा दृढ निश्चय आहे. आतापर्यंत हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठीं सदोदित मी कार्य करीत राहिलों आहे. व तें लामेपर्यंत जगण्याचा माझा निर्धार आहे !"

ता. १ आक्टोबर १९३० मौलाना महंमद अली.

वरील उद्गार काढून पुरते तीन महिनेही झाले असतील नसतील तोंच त्या निर्दय काळानें, ते आपल्या हिंदुमुसलमानांच्या ऐक्याबाबत तयार केलेल्या योजनेसंबंधीं विचार करीत असतांना त्यांच्यावर अचानक घाला घातला !

मौ. महंमद अली लंडन येथें आल्यापासून त्यांना स्वास्थ्य असें मिळालें नाहीं. त्यांतच वरील योजनेसंबंधीं विचार ठरवितांना त्यांच्या मेंदूवर परिणाम झाला व ते बेशुद्ध पडले. कांहीं वेळानें ते शुद्धीवर येऊन इतर मंडळीस उद्देशून म्हणाले माझ्यानें आतां जास्ती बोलवत नाहीं. हा स्वराज्याचा लढा पुढें नेटानें चालवा. हिंदु-मुसलमानांत ऐक्य घडवून आणा, म्हणजे हिंदुस्थानास स्वातंत्र्य कांहीं दूर नाहीं. असें म्हणत असतांनाच हृदयाची क्रिया बंद पडून लंडन हॉइड पार्क मध्यें ता. ४ जानेवारी १९३१ इ. रोज रविवारीं त्यांचें प्राणोत्क्रमण झालें ! मौ. शौकत अली यापूर्वीच आयर्लंड येथें गेले होते. मौ. महंमद अलीच्या मृत्यूनंतर पंधरा मिनिटांनीं ते तेथें आले. बंधूच्या मृत्युमुळें त्यांना अतिशय दुःख झालें ! आणि ते म्हणाले, ' माझ्या बंधूची शेवटची इच्छा हिंदु-मुसलमानांचें ऐक्यासंबंधाचीच होती ' ती मात्र अपुरी राहिली.

मौ. महंमद अली दिवंगत झाल्याची वार्ता हां हां म्हणतां चोहोंकडे पसरली, ठिकठिकाणीं हरताळ पडले, दुखवट्याच्या सभा होऊन त्यांत त्यांचेसंबंधीं गुणवर्णनपर भाषणें झालीं. हिंदुस्थान व परदेश येथील वर्तमानपत्रांतूनहि त्यांचे कार्यासंबंधीं लेख प्रसिद्ध झाले. ( परिशिष्ट व पहा )

पुढें मौ. महंमद अलींचें शव हिंदुस्थानांतच दफन करावें यासंबंधी कलकत्ता, दिल्ली, कराची, लखनौ इत्यादि ठिकाणांहून प्रमुख पुढाऱ्यांचीं मतें मौ. शौकतअलीकडे आलीं होतीं. स्वतः त्यांच्या पत्नींची इच्छा दिलीस मी आग्मा यांच्या कबरेशेजारीं त्यांना दफन

करावें अशी होती. परंतु मौ. महंमद अलींनी मरणापूर्वीच सांगून ठेवल्याप्रमाणें त्यांना पॅलेस्टाइनमधील जेरूसलेम मुक्कामीं हजरत उमरच्या मसजिदीनजीक दफन करण्याचें ठरलें.

ज्या हाइड पार्कच्या हॉटेलमध्यें मौ. महंमद अली राहात होते तेथून त्यांचें प्रेत रात्रीं बारा वाजण्याचें सुमारास लिफ्ट ( विजेचा पाळणा ) मधून खालीं आणण्यांत आलें. त्या वेळीं पहाणारास मौ. महंमद अली आरामानें गाढ झोपीं गेले आहेत कीं काय असें वाटत होतें. त्यांचा चेहराही अत्यंत सुंदर दिसत होता. प्रेत बिघडूं नये म्हणून त्याला दोन इंजेक्शन्सहि केलीं गेलीं. ता. ५।१।१९३१ इ. रोजीं त्यांना गुस्ल ( शवाला आंघोळ घालणें ) देण्यांत आला. मौ. महंमद अलींनीं पूर्वींपासून आपल्याबरोबर शुद्ध खादीचें कफन ( प्रेतास नेसविण्याचे कपडे ) ठेविलें होतें. व तेच कपडे त्यांनीं सांगून ठेवल्याप्रमाणें त्यांच्या शवावर घालण्यांत आले. आणि पुढें इस्लाम धर्माप्रमाणें नमाज पडण्यांत आली. तींत राउंड टेबल कान्फरन्समधील प्रमुख पुढारी, इंग्रज सरकारचे वडे अधिकारी, इराण, मिसर येथून आलेले प्रमुख लोक हजर होते. प्रत्येकानें आपापल्या धर्माप्रमाणें मौ. महंमद अलींच्या आत्म्यास शांति मिळावी म्हणून ईश्वराची प्रार्थना केली.

पुढें पी. अँड ओ. कंपनीच्या जारकंडा नामें बोटींतून मौ. महंमद अलींचें प्रेत, सावदान असलेल्या चंदनी पेटींतून पोर्टसय्यद येथें ता. २१।१।१९३१ इ. रोजीं येऊन पोहोंचलें. तेथें मिसरचे पुढारी, दिवाण, हायकमिशनर हे हजर होते. त्याचवेळीं हजर असलेल्या मिसर पोलिसांनीं सलामी दिली व प्रेत उचलून खांद्यावर घेतलें. अशाप्रकारें ही हृदयंगम मिरवणूक रेल्वे स्टेशनवर येऊन पोहोंचली. तेथून ते जेरुसलेममध्यें आल्यानंतर स्वागतार्थ स्टेशनपासून दफन करावयाच्या ठिकाणापर्यंत दोन लाखांहून अधिक जनसमुदाय

हजर होता. शेवटीं दोन प्रहरीं दोन वाजण्याच्या सुमारास हिंदभूचे देशभक्त व समाजसेवक मौ. महमद अली याचें शव दफन करण्यांत आलें !

मौ. महंमद अली यानीं कार्य करीत असता स्वर्गलोकीं प्रयाण केलें म्हणून ते कीर्तिरूपानें जिवंतच आहेत. कारण अशा व्यक्तिबरोबर तिचें कार्य नष्ट होत नसतें तर त्याच्या पश्चात् त्या कार्यानुसार वागून तें नेटानें पुढें चालविणारे राष्ट्रकंठमणी तयार होतात यात मुळींच शंका नाहीं ! एकंदरीत विचार करता जगामध्यें कित्येक पुरुष जन्मास येतात व मरतातही. परंतु मौ. महंमद अलींचें मरण अशा प्रकारच्या सामान्य जनाहून किती तरी उद्बोधक आहे ! तेव्हां त्याच्याविषयीं दु ख करण्याचें कारण नाहीं. उलट असें मरण यावें असेंच प्रत्येकाचें ईश्वराजवळ मागणें असावे

ईश्वरी नियमानुसार प्रत्येक व्यक्ति काहींना कांहीं हेतूनेंच जन्मास येते.त्या पैकीं दुसऱ्याच्या उपयोगी पडणें,हा एक हेतु होय.त्याप्रमाणें मौ. महमद अलींनीं सर्व आयुष्य देशाच्या व समाजाच्या उन्नतिप्रीत्यर्थ घालविलें. अर्थात् या ध्येयामुळेंच त्याचें नांव अजरामर राहिलें ! एकंदरीत मौ. महंमद अलींच्या चरित्राचे सिंहावलोकन केलें तर त्याच्या ठायीं परमेश्वरानें नेपोलियनचें धाडस, मेकालेप्रमाणें लेखनचातुर्य, बर्कच्या अंगचें वक्तृत्व हीं दिलीं होतीं. त्याचप्रमाणें हिंदी जनतेस पूर्ण स्वराज्य मिळून तें टिकावूं होणेंसाटीं "त्यास हिंदु–मुसल्मानाच्या ऐक्याची जोड देणें " यावद्दलचेही ते पुरस्कर्ते होते. आज त्यांच्या मरणोत्तर का होईना, ब्रिटिश सरकारनें हिंदी जनतेकडे प्रांतिक स्वराज्याची काहीं खातीं सोंपविलीं आहेत. व या सोंपीव खात्याचा कारभार राष्ट्रावर निर्व्याज प्रेम करणारे सुविद्य, सुविचारी व कर्तबगार अशा दिवाणाकडून चालविण्याचा उपक्रम सुरू केला आहे. हें प्रधानमडळ जनतेच्या आकांक्षेप्रमाणें आपापलें

काम अहोरात्र खपून आणि मध्यंतरीं येणाऱ्या निरनिराळ्या अडथळ्यास तोंड देऊन समाधानकारकरीत्या पार पाडीत आहे. तथापि या कामीं मुस्लीमलीग किंवा इतर जातिविशिष्ट पुढाऱ्यांनीं आपापला सवता सुभा पुढें मांडून सुरळीत चाललेल्या कार्यांत अडथळे आणणें हें कितपत फलदायक आहे याचा विचार सूज्ञ वाचकांनींच करावा. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं आमचे चरित्रनायक हयात असते तर या जातिविशिष्ट मागण्या व धार्मिक तंटेबखेडे या सर्वांना करतां येईल तितका स्वतःच्या समाजाचा बोज राखून त्यांनीं विरोधच केला असता. परंतु समाजाच्या व राष्ट्राच्या दुर्दैवानें ते आपल्यांतून नाहींतसें झाले याजबद्दल कोणासही हळहळ वाटल्यावांचून रहाणार नाहीं. त्यांतूनही समाधान वाटण्यासारखी गोष्ट म्हणजे विद्यमान मुस्लीम लीगचे पुढारी बॅरिस्टर महंमदअली, जीना, यांच्यांशीं वरील प्रकारचे धार्मिक तंटेबखेडे व जातिविशिष्ट मागण्या यांसंबंधीं काय तडजोड करावी म्हणजे हिंदुमुसलमानांचें ऐक्य घडून येईल, याजबद्दल महात्मा गांधी, पं.जवाहिरलाल नेहरु,राष्ट्राध्यक्ष बाबू सुभाषचंद्र बोस, मौ० अबदुलकलम अजाद, सरहद्द गांधी खान अब्दुल गफारखान असे जगद्वंद्य पुढारी विचारविनिमय करीत आहेत. तेव्हां यासंबंधीं मुस्लीमलीग व इतर जातिविशिष्ट संघ यांनीं थोडासा स्वार्थत्याग करून या योजनेस पाठिंबा द्यावा आणि मिळालेलें स्वराज्याचें दान पचनीं पाडून, पुढें तें अधिक मिळणेंसाठीं एकजुटीनें प्रयत्न करावा तरच मौ. महंमद अलीचें चरित्र वाचल्याचें सार्थक झालें असें आम्ही समजूं.

या हिंदु-मुसलमानांचें ऐक्यबलावर पूर्ण स्वराज्य मिळून ज्या दिवशीं उभयतांची गुलामगिरींतून सुटका होईल, त्याच दिवशीं मरहूम मौ. महंमद अलींच्या आत्म्यास खरी शांति लाभेल ! कारण

या उच्च ध्येयाप्रीत्यर्थच त्यांनीं आपला देह खर्ची घातला आहे. तेव्हां हेंच कार्य त्यांच्या पावलावर पाऊल ठेवून नेटानें करण्याची बुद्धि हिंदी राष्ट्रसेवकांस होवो, आणि त्यांच्या आत्म्यास चिर-शांतीचा लाभ मिळो; अशी आमची जगन्नियंत्या परमेश्वराजवळ नम्र प्रार्थना आहे.

परिशिष्ट ( ब ).

# मौलाना महंमद अलींसंबंधीं

## जगप्रसिद्ध वृत्तपत्रांचीं व व्यक्तींचीं मतें.

मौ० महंमद अलींनीं राऊंड टेबल कान्फरन्समध्यें केलेलें भाषण आश्चर्यचकित आणि प्रकाश पाडणारें असें होतें.

स्टेटमॅन, लंडन.

मृत्यु पुढें उभा राहिला असतांना देखील ते हिंदु-मुसलमानांच्या ऐक्याबाबत विचार करीत होते.

क्रानिकल, लंडन.

हिंदुस्थानचें स्वातंत्र्य, जागतिक मुसलमानाचें ऐक्य हा जप त्यांचे मुखीं अहोरात्र होता.

डेली एक्सप्रेस, लंडन.

मौ० महंमदअली हे आपल्या ध्येयासाठींच जगले व तें प्राप्त होण्यासाठीं खडतर दुःखें सहन केलीं आणि त्यासाठींच त्यांनीं देह खर्ची घातला.

टाईम्स्, लंडन.

देशाच्या स्वातंत्र्यासाठीं छातीठोक लढणारा शिपाई नाहींसा झाला.

टाईम्स ऑफ बॉंबे.

मौ० महंमद अलींचें आयुष्य म्हणजे ती एक हिंदुस्थाना-प्रीत्यर्थ ईश्वरानें दिलेली देणगीच होती.

क्रॉनिकल, बॉंबे.

मौ०महंमदअली कट्टे मुसलमान, खरे देशभक्त आणि सन्मार्ग-चोऊन गेले व त्यांनीं ऐक्याप्रीत्यर्थ आपला प्राण खर्ची

भारतमंत्री बेजवुड बेन.

मौ० महंमदअली आरंभापासून अखेरपर्यंत हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळावें हें इच्छिणारे होते.

लॉर्ड संके.

मौ० महंमदअली हे जबरदस्त आत्मसंयमी होते. त्यांची हिंमत तारीफ करण्यासारखी होती

लॉर्ड रेडिंग.

मौ. महंमद अली स्वदेशाप्रीत्यर्थ आमरण झटले.

सर जार्ज रॅने.

मौ. महंमद अलींची अत्यंत जरूरी होती अशा वेळीं ते मरण पावले.

सर तेजबहादूर सप्रू.

मौ. महंमद अली हे उच्च विचाराचे मुसलमान असून ते हिंदुस्थानचे अभीष्ट चिंतणारे होते.

पंडित मोतिलाल नेहरू.

मौलानांचा स्वभाव व गुण हीं सर्वांनाच प्रिय होतीं.

महाराजासाहेब बिकानेर.

मौ. महंमद अली यांनीं देशासाठीं आणि समाजासाठीं आपलें सर्व आयुष्य संकटें आणि हालअपेष्टा यांत खर्चिलें.

अमीर नादीरशाहा काबूल.

मौ. महंमद अली हे शूर धाडसी शिपाई होते.

मौ. शौकत अली.

मौ. महंमद अली यांनीं आपला शेवटचा क्षणसुद्धां देशसेवेंत घालविला.

सर अकबर हैदरी.

मौ. महंमद अली हे हिंदुस्थानचे नमुनेदार मार्गदर्शक

मौ. अबदुलकलाम आ[illegible]

---